


यत्र योगेश्वरः कृष्णो यत्र पार्थो धनुर्धरः ॥
तत्र श्रीर्विजयो भूतिर्ध्रुवा नीतिर्मतिर्मम ॥
भगवद्गीता १८।७८.

# समुद्रमंथन

पुष्प १ लें

दिलरुबा प्रकाशन

प्रथमावृत्ति

१९४१

प्रस्तावना:—

प्राध्यापक न. र. फाटक,
रामरुइया कॉलेज, माटुंगा.

मकर संक्रांत, शके १८६२. ] किंमत १। रुपया [ १० जानेवारी सन १९४१.

प्रकाशकः—
रामचंद्र गणेश जोग, M. A., S. T. C.
दिलरुबा प्रकाशन, दादर, मुंबई १४.

संपादक मंडळ

रामचंद्र गणेश जोग
पांडुरंग अनंत वेलणकर
सदाशिव वामन जोग
लक्ष्मण त्र्यं. करंदीकर.



मुद्रकः—
कृष्णाजी नारायण सापळे,
रामकृष्ण प्रिन्टिंग प्रेस,
ज्युडेक्स् बिल्डिंग. त्रिभुवनरोड मुंबई ४.

# प्रस्तावना

मराठी नियतकालिकांकडे पाठविल्या जाणाऱ्या पुष्कळशा लघुकथा साभार परत केल्या जातात. परंतु त्या सगळ्याच टाकाऊ नसतात, अशा अनुभवाच्या अनुरोधानें 'साभार परत' आलेल्या लघुकथांपैकीं निवडक लघुकथा छापाव्या असें योजून दिलरुबा प्रकाशन मंडळानें 'समुद्र-मंथन' या नांवानें चौदा कथांचा एक हप्ता प्रसिद्ध केला आहे. त्या कथांची आश्रयदात्यांना साभिप्राय ओळख करून देण्याची कामगिरी सदर मंडळाचे एक योजक श्री. रा. ग. जोग, एम्. ए., एस्. टी. सी. यांनीं माझ्याकडे सोंपविली आहे. अशी कामगिरी एखाद्याकडे येणें हा मानाचा विषय असला तरी लघुकथांच्या शास्त्रांतील माझ्या अनभिज्ञतेची जाणीव माझ्या मनांत कायम आहे. लघुकथांचें हल्लीं शास्त्र बनलें आहे व त्या शास्त्राच्या कसोटीवर लघुकथांची परीक्षा करणारे विद्वानसुद्धां महाराष्ट्रांत अनेक दाखवितां येतील. त्यांपैकीं मी नसल्याची मला खात्री असून लघुकथांचा एक सामान्य वाचक या नात्यानें 'समुद्र-मंथनांतील' लघुकथा वाचून मला काय वाटलें त्याचा आढावा सादर करण्याचें मीं ठरविलें आहे.

समुद्रमंथनांतील कथा वाचीत असतां जो पहिला मुद्दा उत्पन्न होतो, तो कथांच्या विषयांचा. तीन कथा वगळल्यास बाकीच्या साऱ्या कथांचा आधार विवाहपूर्व किंवा विवाहोत्तर प्रेम हाच दिसतो. बहुतेक सर्व लेखकांनीं स्त्री-पुरुषांच्या तारुण्योन्मुख स्थितींतील परस्परांच्या आकर्षणाचा धागा घेऊन त्याच्या सहाय्यानें आपल्या कथा गुंफल्या आहेत. सध्यां साक्षर जनतेमध्यें याच

विषयाला प्राधान्य असल्याचें दिसून येतें. स्त्री–पुरुषाचा एकमेकां-बद्दल विवाहापूर्वी किंवा विवाहबद्ध स्थितींत ओढा वाटणें अगदीं स्वाभाविक असून त्यामध्यें रूढ नीतिनियमाप्रमाणें कांहीं तऱ्हे-वाईकपणा असला तरी त्याचा समाजाकडून सहानुभूतीनें विचार व्हावा अशी याबद्दल कथा लिहिणारांची अपेक्षा आढळते. या विषयाला एकांतिक महत्त्व देण्याची अभिरुचि अलीकडे आहे. त्याला मानवी जीवनांत महत्त्व निःसंशय आहे, परंतु हल्लींच्या प्रचलित वाङ्मयांत जीवनसर्वस्वाची योग्यता देण्यांत येत असल्यामुळें त्या संबंधांत खोल विचार करावयास लावण्याला समुद्रमंथनांतील बऱ्याच कथा उपयोगी पडतील असा भरंवसा वाटतो.

लघुकथेचा रोख ज्या भावनेवर असेल ती भावना अस्पष्ट ठेवणें हा लघुकथा लेखनाचा नवा प्रकार समुद्रमंथनासाठीं निवड-लेल्या लेखकांनीं चांगलाच साधला आहे. कथेचें तात्पर्य, बुद्धि शिणवूनसुद्धां न उलगडण्याची कित्येकांची हातोटी चिंतनीय आहे. कित्येक कथांचा संकेत आपल्या अस्पष्टतेनें रम्य वाटतो. नामनिर्देशच करावयाचा झाल्यास **देव–दगड कीं खडक ?** या कथेचा करतां येईल. अशाच आणखी तीन चार कथा आहेत. कथांची भाषा बहुतेकांनीं साधी, सोपी व भावनांचा सहज परिपोष होईल अशी वापरली आहे ! मनुष्य बोलतांना व्याकरणशुद्ध प्रयोग करीत नाहीं. लघुकथा लेखकहि सांप्रत बोलण्याच्या झोकाची भाषा वापरूं लागले आहेत. त्यामुळें दोषां-ऐवजीं एक प्रकारें कथेची सहजता उत्पन्न होत असते. पंचवीस नव्हे पंधरा वर्षांमागील लघुकथांची या दृष्टीनें हल्लींच्या लघु-कथांशीं तुलना केल्यास विषय आणि भाषा या दोन्ही

बाजूंनीं हल्लींच्या लघुकथा – वाङ्मयाची कितीतरी प्रगति झाल्याचें दिसून येतें. विशेषतः मनाचे सूक्ष्म व्यापार स्पष्ट करण्याची कुशलता हल्लींच्या लेखकांत पूर्वीच्या मानानें जास्त आढळते. ही कुशलता, भाषेची समृद्धि व लेखकांची मार्मिक निरीक्षण पद्धति या दोन्ही गुणांवर प्रकाश टाकणारी नाहीं असें कोण म्हणेल ! समुद्रमंथनांतील बहुतेक साऱ्या कथांतून या कुशलतेचा व तदंगभूत गुणांचा अनुभव येतो.

सध्यांचें युग लघुकथांचें आहे. त्या युगानुसार समुद्रमंथनाच्या कथात्मक चौदा रत्नांकडे पहातां त्यांच्या योगानें लघुकथांमध्यें चांगल्या प्रतीची भर पडल्याशिवाय रहाणार नाहीं असा भरंवसा आहे. नियतकालिकांच्या संपादक–व्यवस्थापकांनाही प्रस्तुत कथासंग्रहाच्या प्रकाशनाचा उपयोग होण्यास हरकत नाहीं. नव्या कथालेखकांनाही समुद्र – मंथनाच्या उपक्रमानें प्रोत्साहन वाटावें असा त्याचा हेतु आहे. मोठें नांव किंवा छापण्यासाठीं कथा निवडतांना त्या त्या वेळीं असणारी संपादकादिकांची अनुकूल वृत्ति, यांच्या अभावीं अनेक लघुकथा लेखकांचा उत्साह गारठून जात असला पाहिजे हें या संग्रहांतील कथांवरून सहज लक्षांत येणारें आहे. यांतील कांहीं कथा नव्यानेंच लिहिल्या गेल्या आहेत परंतु बऱ्याच कथा 'साभार परत' हा छाप बसून बारगळण्याच्या पंथास लागलेल्यांपैकीं आहेत. दिलरुबाप्रकाशन मंडळाच्या संस्थापकांनीं त्या कथा निवडून जगापुढें ठेवण्याचें साहस केल्याबद्दल 'लघुकथाप्रेमी महाराष्ट्र' त्यांना धन्यवाद देईल यांत संशय नाहीं.

राम रुइया कॉलेज ( माटुंगा ) }
४–१–४१ }

न. र. फाटक.

# — गुजगोष्टी —



रसिक वाचकांच्या मनरंजनासाठीं हें **दिलरुबा प्रकाशन** जन्माला आलें आहे. रसिकवर्गाच्या हातीं त्याच्या पाळण्याची दोरी दिली आहे. त्यांनीं मातृभावनेनें त्याला चांगले झोके दिले तर हें बाळसेदार बाळ आपल्या वाढत्या आयुष्याबरोबर आपल्या प्रेमळ मातापित्यांना आनंदसौख्य देईल.

लघुकथांचा अनुक्रम वाचतांच, त्या निरनिराळ्या लेखकांनीं निरनिराळ्या ठिकाणीं बसून लिहिल्या आहेत, ही गोष्ट सुज्ञ वाचकवर्गाच्या चाणाक्ष नजरेंतून सुटणार नाहीं. तसेंच गोष्टी वाचल्यावर, सध्यां तरुण लेखकांच्या लेखणीची दिशा कोणत्या दिशेनें वहात आहे हेंही ध्यानीं आल्यावांचून रहाणार नाहीं. हा संग्रह ' रसिक ' वाचकांना आवडला तर, असाच किंबहुना याहूनही सरस संग्रह आम्ही लवकरच आश्रयदात्यांच्या हातीं देऊं अशी आम्हांला उमेद आहे.

लेखकवर्गानें आमच्या विनंतीला मान देऊन आपल्या लघुकथा आमच्याकडे प्रकाशनार्थ पाठविल्या याबद्दल आम्ही त्यांचे आभारी आहोंत. प्राध्यापक— श्री. **न. र. फाटक** यांनीं प्रस्तावना लिहून देऊन या नूतन बालकाला नुसतें गौरविलेंच नव्हे तर त्याला शुभाशिर्वादही दिला आहे, असें म्हणायला आम्हांला तिळमात्र प्रत्यवाय नाहीं. त्याचप्रमाणें प्राध्यापक **शं. वा. दाण्डेकर** यांनीं आपलेपणानें हस्तलिखितें वाचूनच अभिप्राय लिहून दिला. मुखपृष्ठाला सौंदर्यशालीनता आणायला, आमचे मित्र श्री. **नागेश आत्माराम नारकर** यांचे मित्र चित्रकार श्री. **बाबुलनाथ वि. गोवेकर** यांनीं अतिशय मेहनत घेतली. यांतील आठवी गोष्ट **तारका** ही ' युवक ' हस्तलिखित मासिकांत व चौदावी गोष्ट **देव-दगड कीं खडक** ही नू. म. हायस्कूल पुणें, यांच्या मासिकांत पूर्वीं प्रसिद्धि पावलेली आहे. त्या गोष्टी आमच्या संग्रहांत पुन्हा प्रसिद्ध करायला त्या संपादकद्वयानें उदार अंतःकरणानें परवानगी दिली. प्रकाशनाच्याबाबत श्री. **बाबुराव सापळे** यांनीं आम्हांला हाताशीं धरून आमची आकांक्षा पुस्तकरूपानें फलद्रुप करायला मनापासून मदत केली. याशिवाय आमच्या इतर वाङ्मयमित्रांनीं आम्हांला हस्तेंपरहस्तें मदत देऊन आपले ऋणाईत करून ठेवलें आहे. त्या सर्वांचे आभार मानून ही गुजगोष्टी सांगायला उचललेली लेखणी खालीं ठेवतों.

**दिलरुबा प्रकाशन**, दादर,
मुंबई नं. १४ ता. ७-१-१९४१.

**संपादक.**

# कथानुक्रम




| | | | |
|---|---|---|---|
| | | | पृष्ठ |
| १ | **योग्य निवड**—ग. गं. जतकर ... | माटुंगा | ९ |
| २ | **अरविंद**—अविनाश M. A. ... | राजापूर | १२ |
| ३ | **दुध्याभोपळ्याचें भांडण**—द. के. बर्वे B. A. | वेंगुलें | २० |
| ४ | **अतिथीची सेवा**—पी. शांताराम ... | कर्जत | २७ |
| ५ | **नीरा**—प्र. वि. माचवे ... ... | संगमनेर | ३० |
| ६ | **अपूर्णा**—कु. शरद् गणेश जोग ... ... | मुंबई | ३४ |
| ७ | **चंदनी पेटींतील झगा**—ह. भी. वाघोलीकर | पुणें | ४२ |
| ८ | **तारका**—विश्वबंधु ... ... ... | दादर | ४८ |
| ९ | **सलणारें शल्य**—आ. नी. साघले ... | दादर | ५१ |
| १० | **निर्मला**—कु. प्रभा ... ... | जैतापूर | ६० |
| ११ | **दोन डोळे**—पी. एम्. निमदेव ... | अमरावती | ६८ |
| १२ | **तिची मुलगी**—व्ही. जी. खांडेकर B. SC; B. SC; ( Ind; Che. ) | इंदूर | ७५ |
| १३ | **कालप्रवाह**—एस्. जोग ... ... | नांदिवडें | ८७ |
| १४ | **देव-दगड कीं खडक !** श्री. त्र्यं. आठल्ये | पुणें | ९५ |

—१—

# योग्य निवड

एका राजाला आपल्या राज्यांतील कांहीं महत्त्वाच्या जागा भरावयाच्या होत्या. त्याकरितां अनेक उमेदवारांनीं दाटी केली होती.

कांहीं कलावंतहि होते त्यांत.

त्यांतच दोन चित्रकार होते.

चित्रकारांचें चातुर्य पाहून राजानें दोघांनाहि पसंत केलें.

दोघेहि अगदीं सगळ्या दृष्टीनें सारखे होते.

त्यांतून कोणाची निवड करावी याचा राजाला पेंच पडला.

दोघांची परीक्षा पाहण्याचें त्यानें ठरविलें.

दोघेहि आपलें कौशल्य दाखविण्यास तयार होतेच.

राजानें एक महिन्याची मुदत दिली व दोघांना आपल्या कलाकृतीचा ताजा नमुना करून आणण्यास सांगितलें.

दोघेहि कामाला लागले.

एक महिन्यानें त्यांच्या कलाकृति तयार झाल्या.

मखमलीच्या आच्छादनाखालीं झांकून दिवाणखान्यांत एका प्रशस्त जागीं त्या ठेवण्यांत आल्या होत्या.

मोठ्या थाटानें राजेसाहेबांनीं त्यांचें अनावरण केलें.

पहिल्या चित्राकडे ते टक लावून पाहात राहिले.

पाहणाराचें अंतःकरण आकर्षून घेण्याइतकी उच्च कलाकृति होती ती! कलेच्या दृष्टीनें रतिभरहि वैगुण्य काढण्याइतकी तींत जागा नव्हती.

एका गुहेच्या तोंडाशीं हरिण–युगुलाचें प्रणयाराधन चाललें आहे, त्यांच्यावर झडप घालण्याकरितां एक वाघ टपला आहे, हरिण–युगुलाला याची जाणीव नसल्यानें एकमेकांच्या सहवासांत तीं अगदीं निमग्न आहेत, निरपराधी हरि-

णांचा या संकटांतून बचाव करण्याकरितां एका झाडावरून एका शिकाऱ्यानें आपली बंदूक वाघावर रोखली आहे, असा प्रसंग दाखविणारें तें एक कमालीचें सुंदर चित्र होतें. त्याखालीं लिहिलें होतें—**रक्षण**—

—चित्र पाहून राजानें स्मित हास्य केलें.

—चित्रकाराचा चेहरा खुलला.

—राजेसाहेब दुसऱ्या चित्राकडे वळले.

—त्यांचा चेहरा जरा गंभीर दिसला.

—चित्रांतील प्रसंग खालीलप्रमाणें होता—

झाडावर पांखरें बसलीं आहेत, एक शेतकरी खालील शेतांत दाणे टाकून खाण्याकरितां पांखरांना बोलावित आहे, निर्भयपणें खालीं उतरून कांहीं पाखरें दाणे टिपित आहेत, असा देखावा होता तो! खालीं लिहिलें होतें—**पालन**—

या चित्रांतहि चित्रकाराचें चातुर्य जागजागीं दृष्टीस पडत होतें. कला ओत-प्रोत भरली होती त्यांत!

चित्र पाहून राजेसाहेबांनीं किंचित् मान हलविली. पण त्यांच्या चेहऱ्यांत विशेष बदल झालेला दिसला नाहीं.–निदान दुसऱ्या चित्रकाराला तसें वाटलें.

तो जरा नाराज झाला.

‘ निकाल मागाहून कळवूं ’ असें सांगून राजेसाहेबांनीं दोघांना निरोप दिला.

दोघांनाहि आपापल्या परीनें निकाल कळल्यासारखें वाटत होतें.

पहिल्याचा चेहरा आनंदित झाला.

दुसऱ्याचा चेहरा पडला. तो गांवीं जाण्याच्या तयारीनें बांधाबांध करूं लागला.

दुसरे दिवशीं राजाकडून त्यालाच बोलावणें आलें.

भीतभीतच तो दरबारांत गेला.

हातांत ‘ नारळ घेण्याच्या ’ तयारीनेंच गेला होता तो.

राजेसाहेबांनीं त्याच्या चित्राची फारच स्तुति केली आणि शेवट शेवट निकाल जाहीर केला “—तुमची प्रधानपदावर नेमणूक करण्यांत येत आहे ”

नारळाऐवजीं पुष्पमालाच त्याच्या गळ्यांत पडली.

पहिल्या चित्रकाराला ही बातमी कळली.

मोठेंच आश्चर्य वाटलें त्याला !

राजाला अरसिकांच्या सदरांत टाकण्यासहि त्यानें कमी केलें नाहीं.

असल्या राजाचें तोंड पाहण्यापेक्षां निरोप न घेतांच निघून जावें असें त्याला वाटलें.

आणि तो करणारहि होता तसेंच !

इतक्यांत त्यालाहि राजाकडून बोलावणें आलें.

औपचारिक निरोप घेण्याच्या हेतूनें गेला होता तो !

आपल्या मेहनतीबद्दल पांचदहा रुपड्या देऊन राजेसाहेब औदार्य प्रकट करतील अशी त्याला खात्री होती.

—पण तेवढ्याकरितां हात बिघडविण्याची त्याची तयारी नव्हती.

अशा घुश्यांतच तो दरबारांत येऊन दाखल झाला.

दुसरा चित्रकार राजाच्या उजव्या बाजूला बसलेला पाहून त्याच्या तळपायाची आग मस्तकाला गेली.

त्याचा लाल झालेला चेहरा पाहून राजेसाहेब रागावण्याऐवजीं उलट खूष झालेले दिसले.

राजेसाहेबांनीं बोलण्यास सुरवात केली.

—'काय बोलणार आहांत तें कळलं' तो मनांत म्हणाला.

इतक्यांत राजेसाहेबांनीं आपलें शेवटचें वाक्य पुरें केलें–" तुम्हांला सैन्याचे सेनापति नेमण्यांत येत आहे."

—प्राण गेलेला मनुष्य खाडकन् उठून बसावा तसें त्याला झालें.

केवढा आनंद झाला त्याला !

—राजानें त्याला आपल्या डाव्या बाजूला स्थान दिलें.

चित्रकारांतून प्रधान आणि सेनापति निवडण्याची राजेसाहेबांची रीत पाहून प्रजेला आश्चर्य वाटलें.

पण ती अयोग्य होती का ?

—२—

# अरविंद

पूना एक्स्प्रेस ठाणा स्टेशनांत शिरली. अविनाशकाका सेकंड क्लासच्या डब्यांत चढले.

गाडी सुरू झाली.

'फोन करा हं बाळला,' मी पुण्याला गेलों म्हणून.

गाडी स्टेशनच्या बाहेर जाईपर्यंत अरविंद तिच्याकडे पहात होता. तसें पाहिलें तर अरविंदला अविनाशकाकांच्या वियोगाचें दुःख होण्याचें कारण नव्हतें. त्याच्या मनांत येतांच त्याला काकांची भेट घेणें शक्य होतें. ते माटुंग्याच्या कॉलेजमध्यें तत्त्वज्ञानाचे प्राध्यापक होते. व तो परेलच्या एका खाजगी शाळेंत मास्तर होता. आठवड्यांतून एकदोन वेळां तरी त्यांची गांठ पडत असे. पण काकांच्या सहवासाचं जबरदस्त आकर्षण होतें त्याला. गुलाबाच्या वासाला कंटाळतो का कुणी कधीं! अगदीं तशीच अवीट गोडी काकांच्या सहवासांत होती, आणि त्यामुळेंच ते गाडींत चढतांच त्याला चमत्कारिक झालें.

माणसाच्या मनांत अति आनंदाच्या वेळींच दुःखाचे विचार यावेत असा मानसशास्त्राचा नियमच आहे कीं काय कुणाला ठाऊक. अरविंद कालपासून काकांकडेच होता. पुष्कळ गोष्टी त्याला बोलावयाच्या होत्या व त्या काकांना सांगून त्यानें आपलें विचारानें भारावलेलें मन हलकें केलें होतें. काकांनींहि त्याला योग्य तो उपदेश केला होता. बाकी, अरविंदला त्यांनीं कांहींहि सांगितलें असतें तरी त्यानें तसें करायला नाकारलें नसतें, पण त्यालाहि एवढी खात्रीच होती कीं स्वप्नांतहि काका आपणाला वाईट मार्ग दाखविणार नाहींत.

आणि आज सकाळीं ते पुण्याला जाण्याकरतां व तो मुंबईला जाण्याकरतां ठाणा स्टेशनांत आले त्यावेळीं त्याचें मन अगदीं प्रसन्न होतें. कांहींतरी नवीन दृष्टि आपणाला मिळाली असें त्याला वाटलें. आपल्याला बरोबर मार्ग दाखविणाऱ्या काकांबद्दल त्याचें अन्तःकरण भरून आलें होतें व म्हणूनच गाडी

दिसेनाशी होतांच त्याच्या मनांत आलें, याहि थोर व्यक्तीला निर्दय काळ आपल्यापासून दुरावणार !

अरविंदला कांहीं सुचेनासें झालें. कितीतरी निरनिराळ्या संमिश्र भावनांनीं गर्दी करून सोडली होती त्याच्या मनांत. अरविंदचा स्वभावच अलिकडे चमत्कारिक बनत चालला होता. Inferiority complex कीं काय, त्याची त्याला बाधा झाली होती. आणि त्यांतच अरविंदच्या सुदैवानें काकांसारखे थोर पुरुष त्याला मार्ग दाखवायला तयार. मग काय अरविंदचें रिकामें मन निष्कारण स्वतःच्या जीवनाची व काकांच्या जीवनाची तुलना करूं लागलें.

अरविंदला वाटलें केवढे थोर अविनाश काका आणि कुठं आपण ! शाळेंत नजरे-खालून जाणारे दोनचारशें विद्यार्थी व कॉलेजांत असतांना झालेले २०।२५ मित्र एवढेंच आपलें जग. उलट काकांच्या जगसागराच्या पलीकडील किनारा तर राहोच, पण अगदीं अलीकडील किनाराहि आपल्या पुरता ओळखीचा झाला नाहीं. मोठमोठ्या सभांतून होणारीं त्यांचीं धार्मिक, सामाजिक, आध्यात्मिक विषयांवरील व्याख्यानें व प्रवचनें, कॉलेजमध्यें अद्यावत् पोषाख न करतांहि त्यांच्याबद्दल सर्वत्र निघणारे प्रशंसोद्गार, फ्राईडचें तत्त्वज्ञान पाठ करूनहि काकांच्या सहवासांत गेल्यावर Sublimation of instincts शक्य आहे असें पटून काकांच्या जीवनाकडे अत्यादरानें पाहाणारे लोक, अरविंदला माहीत होते. व म्हणूनच अशा थोर पुरुषाची व आपली, आपल्यामध्यें विशेष कांहींहि नसतांनासुद्धां अगदीं जवळून झालेली ओळख त्याला अभिमानास्पद वाटत होती.

अरविंद तशाच मनःस्थितींत कल्याण लोकलमध्यें चढला. गाडींत तशी गर्दी नव्हती. बरींच बाकें रिकामीं होतीं. अरविंद एका बाकावर बसणार इतक्यांत एकदम मोठ्यानें हसण्याचा आवाज आल्यानें त्यानें मागें वळून पाहिलें.

त्याच्याच वयाचा एक इसम नवयुग वाचीत होता. व वाचतां वाचतां कांहीं तरी विनोदी बातमीनें त्याला हंसायला लावलें असेल असें अरविंदला वाटलें. कां कुणाला माहीत अरविंदला त्याला कुठें तरी पाहिलें असावें असें वाटलें. पण कुठें तें मात्र आठवेना. अरविंद जसजसा त्याला निरखून पाहूं लागला तसतशी त्याची खात्री झाली कीं, त्या इसमाला आपण कुठें तरी पाहिलें. एवढेंच नव्हे

तर त्याचें व आपलें कुठें तरी बोलणेंहि झालें आहे. त्यानें आपल्या डोळ्यापुढें पुष्कळ प्रसंग आणले पण त्याची खात्री झाली कीं कॉलेजमध्यें, बोर्डिंगमध्यें, हॉटेलमध्यें, क्लबांत कशांतहि याची आपली ओळख जमलेली नाहीं, पण मग आपणाला असें कां वाटतें, याची अरविंदला कांहींच कल्पना येईना. आगगाडीच्या वेगापेक्षां कितीतरी अधिक वेगानें तो आपली स्मृति गतकाळांतून फिरवून आणीत होता, पण व्यर्थ. त्याला एकदां वाटलें 'कशाला हवा हा त्रास—न कां आठवेना आपणाला त्याची ओळख' पण स्वभावापुढें अरविंदचें कांहीं चालेना—त्याला राहवेना, तो चटकन त्याच्या जवळ गेला.

'माफ करा हं, पण एक प्रश्न विचारूं का ?'

'विचार कीं' नवयुगांतून डोकें काढीत त्यानें म्हटलें.

अरविंद चपापला. त्यानें आपणाला एकेरी नावानें कां संबोधावें हें त्याला समजेना. त्यानें ओळखलें तर नसेल आपल्याला. अरविंदला वाटलें उगाच उपद्व्याप केला हा. आतां न विचारणेंहि शक्य नव्हतें.

अरविंदनें चांचरतच म्हटलें "कुठंतरी पाहिलंसं वाटतं तुम्हांला"

"मी नुसतं पाहिलं नाहीं तर राहिलों आहे तुझ्याशेजारीं सहा वर्षें"

—अरविंद पक्का गोंधळला. त्याला वाटलं पुढचें स्टेशन आलें तर उतरावें नि मागच्या गाडीनें जावें. चक्रव्यूहांत सांपडलेल्या अभिमन्यूसारखी स्थिति झाली होती त्याची. ओळख करण्याचा मार्ग सांपडला पण—

जास्त ताणून धरण्यांत अर्थ नाहीं असें वाटूनच कीं काय सुरेशनें एकदम अरविंदच्या पाठीवर थाप मारून म्हटलें "अरे अरु तुझा जुना दोस्त मी सुरु. शाळेंतील वार्षिक सम्मेलनांत गायनांत तुझ्या बरोबरीनें बक्षिस मिळविणारा मी तुझा दोस्त. कां ? पटते कीं नाहीं ओळख ?"

अरविंदला सर्व आठवलें.

त्याला आश्चर्य वाटलें तें आपल्या विस्मृतीचें व त्याच्या स्मरणशक्तीचें. संस्कृत धातू व रूपें पाठ होत नाहींत म्हणून मराठी घेणारा सुरु, दहा वर्षांत एकदांहि गांठ न पडतां इतक्या सहजासहजीं ओळखूं शकतो. अरविंदच्या डोळ्यांपुढें बाळपणचे दोनतीन प्रसंग उभे राहिले व तो त्यांत रंगूनहि गेला असता पण—

सुरेशनें चटकन त्याला खालीं बसवलें.

अरविंदला वाटलें सुरेशनें आपला पराभव केला. पण त्याला कुठें माहीत होतें कीं जीवनाच्या लढाईत याहीपेक्षां मोठा विजय त्यानें आपणावर मिळवला होता.

कांहींतरी बोलायचें म्हणून अरविंद म्हणाला " काय करीत असतोस हल्लीं "?

' काय करीत असेन असं वाटतं ' प्रश्नाचें उत्तर प्रश्नानेंच देण्यांत सुरेशनें आपणाला चित् मारलें असें कारण नसतांहि अरविंदला वाटलें. त्याच्या मनांत आलें, ' खरंच काय करीत असेल हा ! '

दहा वर्षांपूर्वीचा एक प्रसंग जसाच्या तसा त्याच्या डोळ्यासमोर उभा राहिला. सुरेशची व आपली मॅट्रिकच्या निकालाची तार एकदमच आली. केवढा आनंद झाला होता आपणाला. आतां १०।१५ दिवस तरी नुसती मजाच मजा असें आपल्या मनांत येतें न येतें तोंच एक तासाच्या आंत सुरेशच्या वडिलांच्या हातीं त्यांच्या बदलीचा हुकूम पडला.

सुरेश व आपण केलेले बेत त्या हुकुमापुढें तोंड काढूं शकले नाहींत, तरी पण हुकमावरहि शक्कल लढवून आपण चार दिवस सुरेशला आपल्याकडे ठेवून घेतला होता.

सुरेशचे वडील दुसऱ्या दिवशीं सकाळींच मोटार मार्गें मंडळीसह बदलीच्या गांवीं गेले. सुरेश आपला पाहुणा होता.

सहजासहजीं गप्पा निघाल्या. आणि विषय कुठें लागतो गप्पाना ? गप्पांची गाडी ' पुढें काय ' या ठराविक विषयावर आली.

सुरेशला आपण विचारलें " काय करणार तूं पुढें ? "

" व्यासांच्या विद्यालयांत पाठविणार आहेत आपणाला दादा " आपण त्या उत्तरानें चकित झालों होतों.

सुरेशनें आपली पाळी चुकविली नव्हती. त्यानें आपणाला विचारलें होतें– " तूं येणार का गायन शिकायला ? "

आपली तयारी असूनहि वडिलांच्या शब्दापुढें न बोलतां आल्यानें " आपण कॉलेजमध्यें जाणार " असें उत्तर दिलें होतें.

तो विषय कशावरून तरी तेवढ्यावरच राहिला.

चार दिवस राहून सुरेश वडिलांकडे गेला.

आणि आपण वडिलांच्या प्रेमळ सक्तीनें कॉलेजांत नांव घातलें.

अरविंदच्या स्वप्नांतून जागें करण्याचें काम सुरूलाच करावें लागलें. 'काय! नाहीं सांगतां येत ना!'

' ऐक तर, मास्टर सुरेश म्हणतात तो मीच. रेडिओंत प्रोग्रॅम आहे आज माझा.' अरविंदच्या चकित झालेल्या चेहऱ्याकडे पाहून सुरेश म्हणाला ' खरं नाहीं वाटत!'

गाडी माटुंगा स्टेशनांत शिरली. सुरेशनें चटकन् कातडी बॅग काढून त्यांतील आपल्या नांवाचें कार्ड काढून अरविंदच्या हातांत दिलें व लगेच तो खालीं उतरला. 'ये हां या पत्त्यावर. दोन दिवस आहें मी. पुष्कळ बोलायचंय् मला.'

गाडी चालू झाली. अरविंद, सुरेश दृष्टिआड होईपर्यंत सारखा त्याच्याकडे पहात होता.

अरविंदच्या मनांत आलें, ' कसला दिवस उजाडला आज कुणाला माहीत. कालच काकांबरोबर आपलं बोलणं झालं. आपलं म्हणणंसुद्धां त्यांनीं कुठं अमान्य केलं? Man is the creature of circumstances असं आपलं म्हणणं होतं. त्यांनींहि त्याला दुजोरा दिला. पण खरंच का ते म्हणतात त्याप्रमाणें 'It is no use crying over spilt milk'?

अरविंदला वाटलें, ' काकांच्या पुढें ठेवलेला तो प्रसंग त्यांनीं थोड्या निराळ्या रीतीनें सोडवला पण अत्तांच्या प्रसंगाचं उत्तर ते काय देतील?'

सुरेश व आपण सारखेच हुषार व कलाप्रेमी. अगदीं तसंच पाहिलं तर आपणच जास्त हुषार होतों. आणि आपला आवाज नेहमीं आपणाला पहिलं बक्षिस मिळवून देई. सुरेश दुसऱ्या बक्षिसाचा मालक पण आवाजाला शास्त्रीय ज्ञानाचा आधार कुठं आपणाला मिळाला? वडिलांनीं पैसा खर्च-करूनहि आपणाला आपल्या जीवनांतला आनंद मिळवूं दिला नाहीं. सुरेश कमी पैसा खर्चूनहि जीवनांत रंग भरूं शकला.

आज सुरेश मुंबईतील हजारों लोकांच्या आवडीचा गायक आणि आपण

एम्. ए. होऊन 'sit on a mat' सारंग 'you read again' म्हणत शाळेंतील निर्बुद्ध जीवन घालवीत आहोंत.'

कोर्टापुढें केस मांडावी तशी आपली परिस्थिति अरविंद मनांतल्या मनांतच काकांच्यापुढें मांडीत होता.

तो म्हणाला 'काय याचं उत्तर आहे काकांजवळ?'

गाडीनें दादर स्टेशन गांठलें. अरविंदचें विचारचक्र बंद पडलें.

झट्कन तो खालीं उतरला. सकाळचा उत्साह बराच मावळला होता. मनांतल्या मनांत आशावादी बनून भावी आयुष्याचे थोडेफार रचलेले मनोरेहि भंगले होते. त्याच्या मनावर परिणाम करण्याचा प्रयत्न काकांनींच केला होता म्हणून ठीक, नाहींतर अरविंदाच्या स्वभावानें त्याला स्वस्थ बसविलें नसतें. उपदेशकालाच पत्रानें उपदेश करायला त्यानें कमी केलें नसतें.

घरीं अरविंदची तीन पत्रें वाट पहात होतीं.

क्षणभर अरविंदला वाटलें 'मुळींच फोडूं नयेत तीं पत्रं' पण दुसऱ्याचक्षणीं पत्रांनीं त्याला मोह पाडला.

टेबलावरचें एक पत्र उचलतांच त्याला चमत्कारिक झालें. साभार परत असा चौकोनी कागद चिकटवलेली आपली 'परिस्थिती' ही लघुकथा परत आली होती. त्याच्या मनांत आलें यालाहि परिस्थितीच जबाबदार नाहीं का? वशिला कुठें आहे आपला!

अरविंदला वाटलें—कोसळूं देत काय दुःखाचे डोंगर आपणावर कोसळणार आहेत ते आज!

एक क्षणाचाहि विलंब न लावतां त्यानें दुसरें पत्र फोडलें.

त्याचा मित्र देशपाण्डे यानें पाठवलें होतें तें.

त्यानें लिहिलें होतें. "खरंच केवढा फरक आहे शाळा आणि कॉलेजच्या वातावरणांत. कुठं तें कोंदट कुजलेलं Narrow minded असलेलं शाळेचं वातावरण व कुठं कॉलेजचं बौद्धिक, विशाल व रम्यतम जीवन. जन्माला यावं आणि प्रोफेसर व्हावं. खूप खूप गमती सांगायच्या आहेत तुला. येना आठ दिवस इकडे. हो, पण विसरलों. शाळेंत आहेस ना तूं! तुला कुठली रजा मिळायला......मीच—

पुढचें पत्र अरविंदनें न वाचतांच फेंकून दिलें.

त्याच्या मनांत आलें ' याला कारण कोण ? ' ड्रॉपइअर घेऊन कॉम्पिटिशन नसतांना सेकण्डक्लास घेऊन पदक मिळविणारा देशपाण्डे आज प्रोफेसर होतो आणि आपल्या दुर्दैवानं पुरते सहामहिनेहि धड अभ्यास न करतां आल्यानं थर्डक्लास पास होऊन आपण एका शाळेंत शिक्षक होतों—कोण याला जबाबदार ?

तिसरं पत्र तरी उफाळलेल्या ज्वाला शमविण्याकरतां, 'आपणाला आशेचं जीवन देईल ' असं वाटून त्यानं तें फोडलं.

पण मानवी आशा म्हणजे मृगजळ. दिसायला सुंदर पण कुणाची तहान भागते का त्यानें ?

तिसरें पत्रहि त्याच्या मित्राचेंच होतें. " लग्नाची आमंत्रण पत्रिका पाठवून परकेपणाचा भाव उत्पन्न करूं इच्छित नाहीं. ललिता व मी उदइक लग्नबद्ध होणार आहोंत. चांगलीशी भेट घेऊन ये. ललिताहि तुझ्या भेटीची वाट पहात असेल. "

आगींत तेल ओतलें गेलें.

त्यानें पुन्हां वाचलें ' ललिता व मी उदइक विवाहबद्ध होणार आहोंत. '

ललिता पहिल्यानें आपल्या जीवनांत आली तो प्रसंग त्याला आठवला.

आपण कॉलेजच्या गार्डनमध्यें सहज बसलों होतों. स्वभावानुसार तोण्डानें ' होईल केव्हां ' हें पद सुरू केलें होतें. कल्पनाहि नव्हती आपली, पण—

'सत्य' कादंबरीपेक्षांही अधिक चमत्कृतिपूर्ण असतें !

अगदीं तसेंच झालें.

आपल्या ' होईल केव्हां'ला बागेच्या दुसऱ्या कोपऱ्यांतून उत्तर आलं ' होईल हं !' चट्कन आपण उठलों. एक गोरीपान कॉलेज कन्यका आपणाकडे पाहून हंसत होती. आपण थक्क झालों होतों. कधींहि कॉलेजमध्यें कोणत्याच गोष्टींत भाग न घेतां मुलींशीं होतां होईतों बोलण्याचा प्रसंग टाळूनहि आपणावर हा प्रसंग यावा याचें त्याला आश्चर्य वाटलें.

' आपण विचारलं होतं, कुठं राहतां आपण ? '

' तिनें उत्तर देऊन आपणाला चकित केलं होतं '

आपल्या घरासमोरच्याच बंगल्यांत ती रहात होती.

खाण्डेकर म्हणतात तितक्या लवकर नाहीं पण, आपण ओळख-स्नेह-दोन मजले तर सहजच चढून गेलों होतों.

कांहीं टवाळ मुलांनीं 'आहे बुवा करामत' असं आम्हां दोघांना पाहून म्हणायला कमी केलं नव्हतं.'

अरविंदच्या डोळ्यासमोरील तो प्रसंग दूर झाला व त्याची जागा दुसऱ्यानें घेतली.

ललिता इंटर व आपण एकदमच बी. ए. झालों. कांहीं नाहीं म्हटलं तरी दोन वर्षांत तिच्याकडे आपलं जाणं येणं वाढलं होतं-तिलाहि आपण आतां गांवाला जातो म्हणून सांगितलं त्यावेळीं चमत्कारिक झालं होतं.

आपण तिला मोठ्या आवडीनें रेशमी रंगाची छोटी गीता दिली होती. केवढा आनंद झाला तिला.

पण तिनें दिलेली भेट निर्जीव नव्हती. अगदीं प्रेमळ स्वरांत ती म्हणाली होती, 'खरं प्रेम रूपावर भुलतं हा भ्रम आहे' ही गोष्ट माझ्याप्रमाणं आपणहि लक्षांत ठेवा.

किती कष्टानं आपण एकमेकांपासून दुरावलों होतों.

अरविंदच्या मनांत आलं कालसागराच्या प्रवाहांत आपण एका दिशेकडे वाहवलों-ललिता दुसऱ्या दिशेनें गेली.

अरविंदच्या मनांत आलं, 'याला तरी कोण जबाबदार ! ललितेच्या हातांत असो अगर नसो आपल्याशीं दोन वर्षें निर्मळ मैत्री ठेवणारी ललिता आपल्याच स्वभावामुळं प्रभाकरचीहि मैत्रीण झाली होती पण—'

प्रभाकरच्या श्रीमन्तीच्या किरणांनीं ललिता त्याची झाली.

'श्रीमंत अगर गरीब असणं हा माणसाचा गुन्हा आहे का ?'

एकच क्षण त्याला वाटलें, आतांच्या आतां काकांना लिहावं—

'केवळ तुम्ही बोलतां म्हणूनच It is no use crying over spilt milk हें लक्षांत ठेवून वागायचं. पण मला अजून वाटतं **मनुष्य परिस्थितीचा दास आहे, गुलाम आहे.**'

–३–

# दुध्या भोपळ्याचें भांडण

खुंटीवरची टोपी नानांनीं पांढऱ्याशुभ्र डोक्यावर ठेवली. कोपऱ्यांतील काठी हातांत घेतली आणि सावकाशपणें पलीकडल्या खोलींत डोकावत ते म्हणाले, "बनू, मी अम्मळ फिरून येतों हं बाहेर!"

घाऱ्या डोळ्यांची अन् नीटस चेहऱ्याची एक मोहक तरुणी दिव्याशेजारीं कसलीशी एक कादंबरी वाचित बसली होती. पुस्तकांतून मान किंचित् वर करून ती उत्तरली, "काय, बाबा रात्र तर बरीच होऊन गेली?"

"होय, पण पिठासारखं कसं छान चांदणं पडलं आहे नाहीं?"

"शेताकडे जाऊन तुमचा गोजिरा 'दुध्या' पाहून येणार आहां वाटतं? बरं जा तर"

बनूनें पुनः पुस्तकांत डोकें खुपसलें. नाना काठी टेकीत टेकीत घराबाहेर पडले. करारी आणि स्वाभिमानाची–वृत्ति त्यांच्या चेहऱ्यावर दिसून येत होती. त्यांचें सगळें लक्ष आपल्या बाळसेदार आणि नजर लागणाऱ्या दुध्या भोपळ्याकडे होतें. आज इतके दिवस जिवापाड जतन करून त्यांनीं त्याला वाढविलें होतें. रात्रीं अंथरुणावर पडल्या पडल्या, केव्हां केव्हां 'दुध्या' विषयीं त्यांच्या मनांत विचार येऊन त्यांना चैन पडेनासें होई! वाटे कीं कोणी अचूक छापा घालून तें रत्न हिरावून तर नाहीं ना नेणार? आज रात्रींही असाच विचार त्यांच्या मनांत आला, म्हणून ते मुद्दाम एकदां शेताकडे फेरी करण्याकरितां बाहेर पडले.

पावसाची सर नुकतीच येऊन गेल्यामुळें काळसर शेतजमीन थोडीशी चिकचिकीत झाली होती. पहिल्या मेढींत नानांचे बटाट्याचे हिरवेचार रोप आणि मेढीवरचे हिरवट पांढरे टपोरे कॅबिज गड्डे चांदण्यांत चकाकत होते, ती मेढ ओलांडून नाना दुध्या भोपळ्याच्या वेलीकडे वळले. मध्येंच चंद्राआड ढग येऊन कांहीं दिसेनासें होई. पण लगेच थोड्या वेळांत शुभ्र चंद्रप्रकाश पडे.

नानांनीं दुध्याच्या वेलीकडे येऊन आपल्या बाळसेदार, लांबसडक 'पेहल-वान' दुध्याकडे प्रेमभरानें पाहिलें. त्यांनीं त्यावरून कौतुकानें हात फिरविला. एक प्रकारच्या स्वाभिमानाची छटा त्यांचे चेहऱ्यावरून चमकून गेली.

"माझा दुध्या भोपळा यंदा खात्रीनें पहिलें बक्षिस मिळविणार!" थोड्या वेळानें त्यांची नजर दूर पसरलेल्या सगळया शेतवाडीकडे गेली.

सुमारें दहा हातांवर नानांच्या शेताची हद्द दाखविणारा एक उंचवटा होता; व त्या पलीकडल्या शेतांत दुसरी एक दुध्याभोपळयाची वेल एका आंब्याचे झाडावर डुलत होती. आणि तिजवरही एक लठ्ठ व लांब 'दुध्या' लोंबत होता.

नानाचें त्याच्यावर लक्ष गेलें.

"माझ्या दुध्याहूनही तो कदाचित् सरस नसेल ना?" नानांची निश्चिती होईना.

"ती कुणाची बरें शेतवड?—त्या बंडूकाकाची!"

दरवर्षी खानापूरला शेतकी प्रदर्शन भरे. त्यांत गेल्या तीन वर्षी काकांच्या दुध्यालाच पहिलें इनाम मिळालें होतें; पण त्या पूर्वीच्या तीनही वर्षी मात्र नानांनीं पाहिलें इनाम सोडलें नव्हतें. म्हणजे, दोघांची समान वांटणी झाली होती. पण ह्या वर्षाच्या इनामावर नानांची आणि काकांची खरी चुरस होती. नानांची खात्री होती कीं यंदा आपल्या पहेलवान दुध्याला पहिलें बक्षिस खास मिळणार.

पण काकांच्या फळाकडे लक्ष जातांच त्यांना शंका येऊं लागली.

तितक्यांत त्यांच्या पायाला कांहींतरी लागलें म्हणून त्यांनीं खालीं वांकून पाहिलें. तो एक दोरीचा तुकडा होता. कांहींतरी विचार मनांत येऊन त्यांनीं तो उचलला व आपल्या दुध्याची लांबी त्यांनीं दोरीनें अजमावून पाहिली.

"साडेचार हात होईल सरासरी!" ते पुटपुटले.

त्याबरोबरच त्यांच्या मनांत विचार चमकून गेला कीं 'काकांच्या दुध्या-भोपळ्याचीही लांबी पहावी एकदां अजमावून! म्हणजे संशय नको उगीच!'

त्यांनीं चारीकडे वळून पाहिलें जिकडे तिकडे सामसूम होतें. दूरवर कसली

तरी एक आकृति दिसल्याचा त्यांना एकदां भासही झाला. पण तर्कवितर्क करण्यांत वेळ न दवडतां हळुहळू तो मातीचा उंचवटा ओलांडून ते काकाच्या शेतवाडींत शिरले त्यांनीं एकदांही मागें वळून पाहिलें नाहीं. पण त्यांच्या मागोमाग मात्र एक व्यक्ति त्यांचा जलदीनें पाठलाग करीत होती.

थोड्याच वेळांत त्यांनीं काकांच्या दुध्याची लांबी दोरीनें अजमावली. एक दीर्घ उसासा टाकून ते पुटपुटले, " साडेचार हाताच्याही वर ! ऊं ऽ ऽ ऽ.

घरीं परतण्याकरितां त्यांनीं पाठ फिरविली तोंच ' दत्त ' म्हणून काकांची धिप्पाड मूर्ति नानांच्या समोर उभी ! भीति आणि आश्चर्यमिश्र स्वरानें नाना गुळमुळले, " कोण, काका ! "

" होय काका. पण इतक्या रात्रीं काय काम होतं माझ्या शेतांत नाना ! "

" सहज फिरायला आलों होतों. "

" अस्संऽ. छान आहे हें सहज फिरणं ! दुसऱ्याच्या शेतांतला ' दुध्या ' चोरायचं पुण्य इतक्या म्हातारपणीं हवं नाहीं का ! चोर कुठचा ! "

आपल्याला ' चोर ' म्हणतांच नाना खवळले.

" कोण चोर ! मी चोर ! काक्या संभाळून बोल."

" होय, तूं पक्का चोर हें उघड आहे. दुध्याभोपळ्याला हात लावून काय पहात होतास ! "

" सहज त्याची लांबी पाहिली "

" छान केलंस ! "

अशाप्रकारें नानांचा आणि काकांचा त्या रात्रीं चांगलाच खटका उडाला आणि लहानपणचे लंगोटीयार दोस्त एकमेकांवर दांत विचकून लाखोल्या वहात घरीं फिरले.

नाना घरांत परत आले तेव्हां ' स्टोव्ह'चा ' फर्रर्रर्र ' आवाज त्यांच्या कानीं पडला.

" बने, अजून तूं जागीच आहेस ना, अन् हें काय चाललंय् इतक्या रात्रीं ! चहा ! "

" हो ना. बाबा परीक्षा आलीना जवळ, चहाशिवाय अभ्यासाला हुशारी येत नाहीं, बाबा. तुम्ही पण घेतां का थोडा ! "

' छेः इतक्या रात्रीं नको बाळ, नाहींतर मला झोंप नाहीं यायची शिंची !'

× × × ×

थोड्या वेळानें एका जुनाटशा आरामखुर्चीवर नाना अंमळ कलंडले.

बनू त्यांच्या जवळ आली. तिच्या त्या घोटाळण्यावरून तिला कांहीं तरी बोलायचं आहे हें त्या बिलंदर म्हाताऱ्यानें तेव्हांच जाणलें.

" बनू, तुला कांहीं बोलायचं आहे का माझ्याशीं ? "

तरी ती घोटाळूं लागली.

" अग बोलना स्पष्ट. अशी घोटाळतेस कां ? "

आतां तिला जरा धीर आला.

आंवढा गिळत ती म्हणाली,

" बाबा, मी जें विचारीन त्याला हो म्हणाल ! "

" अरेच्या, पण काय विचारणार ते समजल्याशिवायच ! "

" बाबा तुम्हांला ठाऊकच आहे तें ! "

" मला नाहीं ठाऊक काय तें तुझें. नीट बोल ना ! " जरा खणखणीतपणें नाना बोलले.

थोडा वेळ थांबून बनू हळूच म्हणाली, "बाबा, काकांच्या विनायकरावांना..."

" पुरे, पुरे " तिला जास्ती बोलण्याची तसदी न देतां तावातावानें नाना कडाडले,

" समजलों, सारं कांहीं समजलों. बने अल्लड पोरी, ही काय तूं कुत्र्या-मांजरांचीं लग्नं समजतेस ? खबरदार इतःपर त्या हराम काक्याचं आणि त्याच्या पाजी पोराचं नांव माझ्यासमोर काढशील तर ! "

बनूनें तेव्हांच जाणलें कीं नाना आणि काकांच्या मैत्रींत वितुष्ट आणणारी एकादी गोष्ट खास घडली असली पाहिजे.

पुढें ती एक शब्दही बोलली नाहीं.

त्या रात्रीं उशींत डोकें खुपसून ती मनसोक्त रडली. आणि मनांतल्या मनांत तिनें स्वतःला कितीतरी शिव्याशाप वाहिले.

× × × ×

दुसरे दिवशीं सकाळचा चहा झाल्यावर नाना आपल्या पेहलवानी दुध्याची पहाणी करण्याकरितां घराबाहेर पडले. आणि बनू आपल्या खोलीच्या खिडकींत दोन्ही हातांचे तळव्यावर हनवटी ठेवून विषण्ण मनानें, समोरच्या रहदारीचे रस्त्यावर आणि पलीकडल्या काकांच्या छोट्या हवेलीकडे पहात होती.

थोड्या वेळानें खिशांत हात घालून तिच्याकडेच येत असलेल्या एका तरुण व्यक्तीकडे तिची नजर खिळली. तोंच काकांचा विनू रहदारीच्या रस्त्याकडून वळण घेत तिच्या खिडकीच्या अगदीं जवळ आला. त्याच्या हातांत सुंदर रंगी-बेरंगी रानफुलांचा एक गुच्छ होता.

"आज इकडे कां आलांत आपण ?" तिनें स्मित करीत विचारलें.

"माझ्या लाडक्या जिवाकरितां !" दोन क्षणांनीं तो उत्तरला.

"पण इतःपर इकडे येऊं नका आपण !"

"कारण ?"

"कारण मी कुमारिका ! नानांची संमती नाहीं ह्या गोष्टीला !"

तो हंसत उद्गारला, "ऑं, अस्सं ? मी ही कुमार अन् माझ्या काकांचीही पण संम्मती नाहीं तुला भेटायला !"

"म्हणजे मी नाहीं समजलें ?" आपल्या घाऱ्या बाहुल्या मोहकपणें खेळवीत ती म्हणाली.

"बनू, मला काकांनीं सारं कांहीं सांगितलं आहे, याला कारण...दोन दुध्या भोपळ्यांचं भांडण— "

"पण त्याचा परिणाम मात्र आम्हां तरुण कोहळ्यांना चांगलाच भोगावा लागणार !"

तिनें त्याच्यावर मात केली.

पुढें ती हळूच गुणगुणली, "मला कि‌ऽनई—एक गंमत सुचली आहे !"

"कसली बोवा ?" तिच्या हनवटीवर तो टिचकी मारीत हंसला.

"छेः ! इथं नाहीं सांगायची. आंत या ना आपण ?" पलीकडल्या दारां-तून तो तिच्या खोलींत शिरला.

"इनामदार...त्यांना आपण सांगूं...सुरळीत होईल." वगैरे तुटक वाक्यें कानावर येत होतीं. बराच वेळ त्या प्रणयीयुग्माच्या कानगोष्टी सुरू होत्या.

कांहीं वेळानें त्यानें तिचें एक गोडसें ...... तिच्या मूळच्या गौर चेहऱ्यावर गुलाब फुलले–मान फिरवीत ती म्हणाली, "इश्शऽऽऽ!"

उत्साही चेहऱ्यानें विनू खोलींतून बाहेर पडला.

× × ×

आसुरी विचारांनीं नानांच्या मनांत काहूर माजवून सोडलें. एकच बेत ठरला 'सूड'!–"काक्याचा सूड!! लेकाचा, मला चोर म्हणतो नाहीं का? पाहून घेईन. आजची शेवटची रात्र! उद्यां प्रदर्शनाचा दिवस. आजच्या रात्रीं काम साधून घ्यावयाचेंच. बस्स–ठरलें."

—आणि बनूच्या कालच्या प्रश्नानें ते मुलीवरही चांगले चिडल्यामुळें तिच्याशीं साऱ्या दिवसांत ते एक चकार शब्दसुद्धां बोलले नाहींत–पण ती मात्र स्वतःशीं उत्साही दिसत होती.

रात्र बरीच उलटून गेली तरी नाना निजले नाहींत. बनूही कांहीं वाचित बसली होती.

"बनू, मी जरा फिरून येतों हं बाहेर!"

बनूनें सम्मति दिली.

पण नाना बाहेर पडले नाहींत तोंच घराची कडी लावून घेऊन तीही त्यांच्याच वाटेकडे हळुहळू वळली.

थोड्याच वेळांत नाना आपल्या वेलाजवळ आले. मनांत विचार घोळत होते–आपल्या पेहलवानी दुध्याकडे एकवार नजर टाकून मग काक्याच्या दुध्या भोपळ्यावर गुपचुप हल्ला चढवून त्याचा नायनाट करून सोडायचा.

पण आपल्या वेलाजवळ येऊन नाना पहातात तों नानांचा पेहलवानी भोपळाच कुठें दिसेना. निराशेनें नाना मटकन् खालीं बसले. पोटच्या पोराप्रमाणें जतन केलेलें फळ नाहींसें झालेलें पाहून नानांच्या डोळ्यांतून अश्रू आले. पण किती? एक क्षण!–दुसऱ्या क्षणीं सूडाच्या निकराचा जय झाला. दांतओंठ खात उठून पलिकडल्या काक्याच्या शेताकडे चालूं लागले.

"काक्या" ते पुटपुटत होते, "माझा भोपळा चोरून नेलास होय? थांब, तुझाही ठेवीन का आतां शिल्लक?"

बेभान होऊन ते चालत होते. तोंच समोरून कोणीतरी येऊन त्यांचा हात घट्ट पकडला. त्यांनीं मान वर करून पाहिलें तों 'काका'!

" कोण तूं हराम काक्या ? "

बेशरम नाना, माझ्या शेतांतला भोपळा चोरून नेलास कीं नाहीं बोल आधीं ! "

" काक्या चूप. चोराच्या उलट्या × × हेंच खरं. माझा भोपळा चोरून पुनः माझ्यावर ताण ! "

आतां दोघेंही म्हातारे एकमेकांकडे अतिशय संतापानें पाहूं लागले. आणखी एकच क्षण गेला असता तर मात्र तें भांडण कोणत्या विकोपास गेलें असतें कोणास ठाऊक—पण तितक्यांत—दोन व्यक्तीनीं मागून हळूच येऊन काकांचा हात धरला. काकांनीं मागें वळून पाहिलें आणि ते ओरडले, " कोण ? कोण विन्या, आणि हें कोण ? " चंद्राआड ढग आल्यानें त्या दुसऱ्या व्यक्तीचा चेहरा काकांना ओळखतां आला नाहीं.

" मी, मी इनामदार ! " ती व्यक्ति उत्तरली.

" इनामदार साहेब माफ करा मला "

राजाप्रमाणें असणाऱ्या इनामदारांना पाहून दोन्ही म्हातारे नरमले. आणि तितक्यांत बनूनें येऊन नानांना हाक मारली, " बाबा, बाबा "

थोडा वेळ सर्वच स्तब्ध होतीं. शेवटीं विनू म्हणाला, ' दोन्ही दुध्याभोपळ्यांचा चोर मीच. माझ्या भावी आयुष्याकरितां मला ही ' शर्विलकगिरी ' करावी लागली. '

" आणि याच्यापुढें मी सांगतों " इनामदारांनीं सुरवात केली, " दोन्ही भोपळे माझ्या प्रदर्शनांत केव्हांच येऊन पोहोंचले, माझा मित्र विनू याच्याकरितां मुद्दाम इतक्या रात्रीं इथं येऊन मला तुम्हांला सांगायला मोठा आनंद वाटतो कीं, यंदाचं पहिलं बक्षिस मी तुम्हां दोघांना सारखं वांटून द्यावयाचं ठरवलं आहे ! "

दोन्ही म्हातारे कृतज्ञतेनें इनामदारांकडे पहात होते.

" पण ही सगळी गम्मत माझी म्हणून तुमच्या बक्षिसाचं सारं श्रेय मला बरं का ? " बनू काका–नानांच्याकडे पाहून हसत म्हणाली.

" तुम्ही तरुण मुलं म्हणजे मूर्तिमंत सैतान आहांत ! " दोघेही म्हातारे उद्गारले. विनू चटकन् पुढें म्हणाला, ' पण या मूर्तिमंत सैतानांना, ' ' नांदा तुम्ही सौख्य भरें ' एवढा मात्र आशीर्वाद असावा. "

—४—

# अतिथीची सेवा.

आकाशांत मेघ जमा झाले होते. थोडाफार वाराही सुटला होता. माझा फिरावयास जाण्याचा बेत डळमळूं लागला. पण अखेर मनाचा हिय्या करून मी बाहेर पडलोंच. सुमारें अर्धा मैल गेलों असेन नसेन मी—तोंच पाऊस सुरू झाला. यांत अनपेक्षित असं कांहींच नव्हतं. मी छत्री उघडली व चालूं लागलों. एकाएकीं भयंकर वारा सुरू झाला! माझ्या हातांतील छत्री खालवर होऊं लागली. अडदांड वाऱ्यापुढें माझ्या चिमुकल्या छत्रीला हारच खावी लागली. मी छत्री मिटली व एका झाडाखालीं आश्रयास उभा राहिलों आणि वाटलं सुटलों मी......

पण तिथंही माझ्या मनाला स्वस्थता नव्हती! म्हणतातना, मन चिंती तें वैरीहि न चिंती! आकस्मिक हें झाड कोसळून पडलं तर......! माझ्या मनांत भीतियुक्त छटा चमकून गेली. सुदैवानें वारा लवकर कमी झाला. पण पाऊस कांहीं केल्या थांबेना. तरीसुद्धां छत्री उघडण्यास आतां कोणतीच अडचण नव्हती. पुढं जाण्यांत आतां अर्थ नाहीं हें जाणून मी घरीं येण्यास निघालों. वांकड्यातिकड्या पावसामुळें माझा लेंगा भिजून चिंब झाला होता. अगदीं गारठूनच गेलों होतों मी. तोंच माझी दृष्टि समोरील दृश्यावर स्थिर झाली!

एक षोडषवर्षी बाला रस्त्याच्याकडेस उभी राहून छत्री दुरुस्त करण्यांत गुंतली होती. मला वाटतं मघांच्या अडदांड वाऱ्याचेंच कृत्य हें. साधं स्त्री-दाक्षिण्य नसावं ह्या दांडग्याला, मी मनांत म्हणालों, पण निसर्गाच्या साम्राज्यांत स्त्री—पुरुष या भेदाला वाव नसतोच मुळीं! ती पाठमोरी असल्यामुळं माझ्या अस्तित्वाची जाणीव तिला नसावी. "छत्री मोडली वाटतं! मघांच्या वाऱ्याचा प्रताप दिसतोय." मी जवळ जातांच म्हटलं. त्याबरोबर केवढ्यांदा दचकली ती! "ताड्याच खिळखिळ्या झाल्या" मंदस्मित करीत ती उत्त-

रली. 'पाहूं काय झालंय् तें' असें म्हणून मी तिच्या हातांतील छत्री घेतली, अर्थात माझी छत्री मी तिच्या हातांत दिली.' मी छत्री दुरुस्त करूं लागलों.

मी भिजत आहें हें पाहून ती म्हणाली, "अय्या! हें काय? भिजतांहात ना तुम्ही? मी तरी काय वेडी, तुम्हाला भिजत ठेवून तुमचीच छत्री मी दड-पून बसलें! खासा न्याय!" व असें म्हणून ती हसली. मीही हंसल्यासारखं केलं. जंग जंग पछाडलें तरी छत्री चांगली होण्याचं चिन्ह दिसेना. बिचारीचा आजार फारच विकोपास गेला होता! माझ्यासारख्या गांवठी डॉक्टर (?) च्या 'ट्रीटमेन्ट' नें ती सुधारणार असें कांहीं वाटेना! "राहूं द्या बाई ती, घरीं गेल्यावर पाहीन मी" तिनें मला त्या प्रसंगांतून सोडवून म्हटलं. पडत्या फळाची आज्ञा घेऊन मी छत्री तशीच तिच्या हातांत दिली. मग मात्र मला पंचाईत पडली. एका अनोळखी मुलीबरोबर एका छत्रींतून जाणें थोडं चमत्का-रिकच वाटूं लागलं. मी तें टाळीत आहें असें पाहून ती म्हणाली, "इतकं कांहीं नको बाई भ्यायला. प्रसंग पडला म्हणजे सर्व कांहीं करावं लागतंच माण-साला. मला थोडा धीर आला तिच्या भाषणानं. मी थोडा अंग चोरूनच चाललों होतों छत्रींतून! एकादा संस्कृति संरक्षक मंडळांतील पेन्शनर याच रस्त्यानें आला तर! माझ्या मनांत शंका येऊन गेली. ती मात्र निर्भीडपणें मला—धक्के देत चालली होती. प्रत्येक धक्क्याबरोबर कसला तरी अननुभूत आनंद होत होता मला—माझं सर्व शरीर रोमांचकांनीं पुलकित होत होतं!

थोड्याच वेळांत आम्ही एका ओढ्याजवळ आलों, पाऊस अद्याप पडतच होता. पाणी थोडंच होतं पण खळखळाट फार होता त्या ओढ्याला. इतक्यांत पाय निसटल्यामुळें तिनं सपशेल लोटांगणच घातलं पाण्यांत! आतां मात्र मला 'यमुना जळीं...' ची आठवण झाली! बरंच लागलं होतं तिच्या गुडघ्याला. तिला तर उठतांच येईना; माझी स्थिति फार शोचनीय झाली होती. ती पाण्यांतच बसून राहिली. तिचं पातळ भिजून चिंब झालं होतं. कसं तरी मोठ्या प्रयासानं वर उठाविलं मी तिला. माझ्या अंगावर भार टाकून चालूं लागली ती! हो, तिला जर चालतांच येईना...तर ती तरी करणार काय? थोड्याच वेळांत आमच्या स्वाऱ्या तशा केविलवाण्या (!) स्थितींत गांवांत

दाखल झाल्या ! ओळखीच्या माणसांच्या नजरा चुकवीत चाललों होतों मी ! पाठीमागून "आहे बुवाऽऽऽ" चे आवाज ऐकूं येतच होते. त्या सर्व गोंधळांत मी तिचें नांव स्थळ इ. विचारण्यास विसरलों. माझं घर जवळच होतं. आतां घरावरून हिच्याबरोबर अशा स्थितींत जावं लागणार हें मनांत येऊन मी लज्जेनें चूर झालों ! त्यांत तिच्या वर्तनानें तर जास्तच बुचकळ्यांत पडलों ! तिनं माझ्या घराकडे बोट दाखवीत म्हटलं, "आलं माझं घर. जातें मी आतां. फार त्रास पडला तुम्हांला माझ्यामुळं, अच्छा. I am very much obliged to you हं उद्यां सवड काढून चहाला या आमच्याकडे. अनायासं ओळख होईल आमच्या घरांतल्या मंडळींशीं तुमची......"

मला तिच्या या बोलण्याचा कांहींच अर्थ-बोध होईना ! मी आपला पहातच राहिलों तिच्याकडे वेड्यासारखा ! माझ्या घराला आपलं घर समजून पुन्हा मलाच चहाचं निमंत्रण...! हिला गारठल्यामुळें भ्रम तर झाला नाहीं? ओळख ना देख ? अर्धा मैल लोढण्यासारखी हिला गांवांत आणली, तरी हिचा गळेपड्डूपणा संपेना ?

एकाएकीं नांव वगैरे विचारणं असभ्यपणा होईल म्हणून मी तसं कांहीं विचारलं नाहीं. मात्र आतां मला राहवेना ! 'आपलं नांव ?' मी पृच्छा केली. मी, 'मिस् लीलावती गुप्ते' उत्तर आलं. 'कोण ! गुप्ते ?' माझ्या तोंडून आश्चर्योद्गार बाहेर आले. आतां मात्र माझ्या डोक्यांत चक्क प्रकाश पडला ! पण अजूनसुद्धां थोडी शंका होतीच. 'विनायकराव गुप्ते आपले वडील ?' मीं विचारलं. 'हो, हो, तेच माझे वडील. आम्हीं इथं प्रभाकरपंतांकडे पाहुणे म्हणून आलों आहोंत.' विनायकराव माझ्या वडिलांचे बालपणचे स्नेही. ते दुपारीं दोनच्या गाडीनं आले तें माहीत होतं मला. परंतु त्या वेळीं मी घरीं नसल्यामुळें त्यांच्याबरोबर दुसरं कोणी आहे हें मला कळलं नाहीं ! व विनायकरावांचीही भेट झाली नव्हती. बाहेरून आल्यावर चहा घेऊन मी लगेच फिरावयास गेलों होतों ! कोणत्याही प्रकारें ओळख न देतां मीं सहजगत्या म्हणालों, 'चला मलाही त्यांच्याकडे यायचं आहे !'

—५—

# मीरा

हातांतलें पुस्तक मिटून, आरामखुर्चीवर बसल्याबसल्याच मीं तें भिरकावून दिलें. तें फरपटत टेबलाच्या दुसऱ्या कडेला गेलें—पानांची फडफड झाली.

माझ्या हृदयाचीही तशीच फडफड चालली होती !

—काय बुवा, विरंगुळा म्हणून वाचनाचा तोडगा काढला अन् तोही फसला अंऽ! मी मनाशीं पुटपुटलों.

—हाताचीं बोटं मोडून मीं अंगाला मोठा पिळोखा दिला. मला एक जांभई आली.

—रविवारचा सुटीचा दिवस म्हणजे माझ्यापुढें एकादा सैतान उभा जणूं !

—अन् तो सुटीचा दिवस म्हणजे एकादा सण !

—दसऱ्याचे दिवशीं मनुष्य निर्विकारपणें सोनें लुटील. दिवाळीचा आनंद फिका पडेल. संक्रान्तीचें दिवशीं ' तिळगूळ घ्या गोड बोला ' असें मनुष्य वेळीं कडू तोंडानें म्हणेल आणि अशा प्रसंगीं आप्तेष्टांच्या भेटीसुद्धां औपचारिक वाटतील त्याला.

—पण या सुटीचे दिवशीं मनुष्याचे हालचालींत जिवंतपणा असतो.

—साडेपांच दिवस नोकरी करून दमलेल्या जिवांना एकादा क्षण सिंहस्थ पर्वणी देखील महत्त्वाची वाटायची नाहीं या रविवारचे सुटीपुढें !

—शिवाय सबंध आठवड्यांत न होणारे विशिष्ट प्रकार या दिवशीं होत असतात. आपल्या प्रियपत्नि आणि मुलाबाळांबरोबर गांवांत हिंडून कांहीं जिन्नस खरेदी करावयाचे म्हणजे कोण मौज. रोज खरेदली जाणारी भाजी खरेदी करतांनासुद्धां एकप्रकारें गम्मत वाटते. त्यांचे समवेत फिरावयास जावयास एक प्रकारें नवचैतन्य येतें. ती मोकळी हवा, त्या नानाविषयावरील गप्पासप्पा ! दसऱ्याचे दिवशीं सीमोल्लंघनाचा आनंद सुद्धां याच्यापुढें कःपदार्थ ! आणि त्यांतून सिनेमाला जाण्याचें ठरलेलें असावें !

—मी तर या सर्व गोष्टींना पारखा झालों होतों.

—नीरेच्या अकस्मित् मृत्युनें मला जबर धक्का बसला.

—हृदयाला चटका देऊन गेली बिचारी.

—महात्माजीं ना ‘ नीरा ’ एकवेळ अप्रिय वाटेल. पण माझी नीरा मला सदोदीत प्रिय होती. जाऊं द्या–प्रेमाच्या गोष्टी बोलून कुठं कळत असतात !

—तसा तिचा माझा प्रीतिविवाह झाला नव्हता–आपला नेहमींसारखा !

—‘ प्रेमोत्तर विवाह कीं विवाहोत्तर प्रेम ’ हा प्रश्नच मला पडला नाहीं.

—मुलगी पाह्यला गेलों......पसंत पडली......लग्न झालें.

—लग्न झालें अन् तिची न् माझी मैत्री जडली जणूं !

—मी अगदीं अलीकडचे पद्धतीनें विवाह केला नाहीं म्हणून कोणत्याही बाबतींत दुःखी–कष्टी नव्हतों. म्हणजे मी प्रतिगामी विचारसरणीचा आहें असें नव्हे, तसं म्हटलं तर माझा जुन्या गोष्टींवर आणि देवावर तितका विश्वास नव्हता.

—तिनें हट्ट घेतला, म्हणे मला आपल्या बंगलीमागें संगमरवरी तुळशीवृंदावन बांधून द्या !

—आणि मी बांधून दिलेंही !......विरोधाला जागाच नव्हती. माझा देवावर विश्वास नव्हता. पण म्हटलं आपलं काय जातंय् !......आम्ही मुळीं मैत्रीच्या नात्यानेंच वागत होतों !......असेना तिचा देवावर भाव !

—तुलशीपूजन करीत असतां कधीं कधीं मी हळूच गॅलरींत जाऊन उभा राहीं अन् खालीं पूजनांत गढून गेलेल्या नीरेस न्याहाळीं !

—मुखावरील पावित्र्याच्या त्या रेषा !

—जगांतील सर्व काव्य जणूं त्या मुखकमलावर ओतलंय् !

—आणि मग, संसार असार आहे !...तो कष्टमय, दुःखमय आहे...... संसार एक माया आहे...मृगजळ आहे !...वगैरे प्रतिपादणाऱ्या तत्त्वशान्यांची मला फार कींव येई.

—कधीं कधीं अशा प्रसंगीं मी छायाचित्र घेई. त्याला नांव द्यावें **‘ तुलसी पूजन ’**

—तशीं आमचीं वारंवार भांडणंही होत.

—ती मजवर रागवे.

—मीही तिचेवर रागवावें

—“ अग्गो ऽ बा ऽ ई ऽ, रागतर एका माणसाचे नाकाच्या शेंड्यावर असतो अं ऽ!” नीरेनें मग म्हणावें अन् एक गोडसा अभिनय करावा.

मग आम्ही दोघेंही हसूं !

मला एक प्रसंग आठवतो—

—मी तिला ‘ तुलसी पूजन’चें छाया चित्र दाखविलें.

—“ म्हणजे, हें काय ” ती मिस्कील हास्य करीत म्हणाली, “ म्हणजे एका C. I. D. ची आमच्यावर पाळत असते म्हणायची ! पण हाच C.I. D त्या C. I. D ला बेडी घालून बंदिवान् करील अं ऽ ऽ !

—अन् मला बंदिवान् करून तिनें आपल्या ताब्यांतही घेतलें !

—या विचारांनीं तर आणखीन् बेचैन केलें मला.

—मी ताड्दिशीं उठलों.

—कोटाच्या एका बाहींत हात घातला अन् अंगावर पांघरला.

—टोपी हातांतच घेतली.

—अन् रस्ता फुटेल तिकडे निघालों.

—मी एका बागेंत शिरलों. इकडे तिकडे थोड्या चकरा मारल्या अन् एका सोनचाफ्याच्या बुंधाशीं हिरवळीवर बसलों.

—हृदयाच्या शब्दशः चिन्ध्या झाल्या.

—याच वृक्षाखालीं मी अन् नीरा तासन्तास गप्पा मारीत बसत असूं. आमची ही जागा जणूं वहिवाटीचीच. आज मात्र नीरा नव्हती !...क्षितिजाकडे शून्य दृष्टि लावून मी वेड्यासारखा बराच वेळ बसून राहिलों.

—माझ्या पुढ्यांत एक फूल पडलें.

—फुलानें माझें लक्ष वेधून घेतलें.

—अगदीं अलगद उचलून घेतलें मीं तें.

—नीरेचा शिरस्ता होता. ती नेहमीं सोनचाफ्याचें एकच फूल अंबाड्यावर खोंवी अन् ते एकच फूल तिचें सौंदर्य बेसुमार खुलवी.

—मी घरीं आलों.

—भक्तिभावानें तें फूल नीरेच्या छायाचित्राला वाहिलें.

—आरामखुर्चीवर मी पडलों. टक लावून पाहात होतों मी छायाचित्राकडे. फिरून आल्यापासून मला किती हुशारी वाटत होती!...मला एक अभिनव कल्पना सुचली. ती लगेच अमलांत आणावयाची मी ठरविलें.

× × ×

—आज एक नवी चीज माझ्या 'दिवाणखान्यांत' विराजत होती.

—मुद्दाम बागेंत जाऊन एक सोनचाफ्याचें फूल घेऊन आलों.

—एका कलावंत मित्रानें 'तुलसी पूजना' वरून एक छोटा बस्ट–पुतळा तयार करून दिला होता. अंबाड्यावर फूल खोवतां येईल अशी व्यवस्था केली होती.

—मी तें फूल अंबाड्यावर खोवलें.

—हुबेहूब, साक्षात् नीरा.

—तुलसी पूजनाचे वेळची पावित्र्याची रेषान्‌रेषा स्पष्ट उमटली होती चेहऱ्यावर.

—"नीरा!" मी विदीर्ण अंतःकरणानें तिला हांक मारली.

—मला 'ओ' मिळाली नाहीं.

—धाड्‌दिशीं मी कॉटवर अंग टाकलें.

—६—

# अपूर्णा

चांगलं ऐसपैस माळरान होतं तें. सभोंवतीं बारीक खुरटीं झुडपं. एका बाजूला इनामदारांची लांबलचक बाग हंसत असे. कोंकणांतला भाग नि त्यांत वसंताचा बहर. शहरांतल्या उद्यानासारखी कापून सारखी केली नव्हती ती हिरवळ. पण स्वातंत्र्याचं पाणी लागलं होतं तिला. माळरानावरून कितीतरी वेळां वारा गात येई, अन् हिरवळीचं ओझरतं चुंबन घेऊन पळे. किती लाजे ती! मान लववी व सामोरी जाई. चैत्रवैशाखाचे दिवस ते. कुठं एकादा मेघ आकाशांत फिरत होता. सूर्यानें नावडतीच्या महालाकडे पाऊल टाकलं. आकाशांत नवरंग उधळले. रजनी व चन्द्रकांत हातांत हात घालून हांसत खिदळत आलीं.

जवळच एक तळं होतं. तळं कसलं! डबकंच तें. थोडं पाणी सांचलं होतं म्हणून तळं म्हणायचं. इनामदारांच्या बागेतील नारळीपोफळींचे शेंडे आपला झोंक पहात नाचतातना त्या तळ्यांतून...

रजनी अन् चंद्रकांत दोघं तळ्याजवळ येऊन बसलीं. त्यांच्या त्या काळ्या छाया पाण्यांत प्रतिबिंबित झाल्या होत्या.

उगाचच एकमेकांकडे पहात रजनी अन् चंद्रकान्त तळ्याजवळून उठून एका झाडाखालीं जावून बसलीं. दोन पक्षी भर्रकन् उडून गेले. एक जोडी आली. दुसरी विहारासाठीं उडाली.

प्रतिदिनीं येत तीं दोघं जणं तेथें हांसत खेळत. झाडाच्या आड रजनीनं लपायचं नि चंद्रकांतानं शोधून काढायचं. नेहमींचा खेळ. पण कस्तुरी सारखी जवळ ठेवली म्हणून काय दुःख होतं! कविवर्यांची कविता सतत वाचली म्हणून काय आपलं समाधान होतं! प्रत्येक वेळां नवनवीन. प्रेमाचे लपंडाव होते ते त्यांचे. त्या दोघांचे आनंदी चेहरे कितीतरी उडत जाणाऱ्या पक्षांनीं पाहिले होते. रजनीची सवत, निशा खेळायला आली कीं दोघं परत फिरत घराकडे.

## रत्न ६ वें

रजनी अतीशय सुंदर होती. संध्याकालीन मेघांत नसेल इतकी गुलाबी छटा तिच्या त्या गालांवर उमटत असे. भव्य पण आटोपशीर कपाळ, नाक अगदीं सरळ होतं तिचं. पडणारी खळी तळ्यांत मारलेल्या खड्याच्या भाकरी-सारखी वाटे. काळ्या पातळांत अतीशय खुलून दिसायची ती. अलीकडे ती खेड्यांत आली होती, तरी मूळची शहरांतलीच. तेव्हां ' स्वस्तिकच्या ' शुभचिन्हांचीं ' इयररिंग्ज ' मानेवर रुळत होतीं. हंसतांना ओंठावर बोट ठेवायची खोड होती तिला पण त्यामुळेंच ती चंद्रकांताला अतिशय आवडायची.

### त्याचं असं झालं—

कॉलेजला सुटी झाली. मुंबईहून घरीं जाण्यासाठीं ती बोटीवर चढली. ' होल्ड ऑल ' पसरला अन् पोंचवायला आलेल्या मैत्रिणीजवळ बोलत बसली. हमालांची धांवपळ, उतारूंची धडपड चालू होती. बोटीनं भोंगा फुंकला. मैत्रीण पत्र पाठवायला सांगून निघून गेली. तेवढ्यांत काचा मारलेला, केस नीटनेटके बसविलेला एक तरुण हातांत एक पिशवी घेऊन आंत आला. रजनीला कसली तरी आठवण झाली. तो तरुण न् ती लहानपणीं एकाच वर्गांत होतीं. मधेंच त्याच्या वडिलांची बदली झाली—तो निघून गेला. त्यानंतर ही पहिलीच भेट. त्यालाहि ती स्मृति झाली असावी असं वाटलं रजनीला. तो क्षणभर हंसून तिथं जागा नाहीं असं समजून तो दुसरीकडे निघून गेला.

त्या तरुणाच्या हातांत फक्त एक पिशवी होती. रजनीचं लक्ष त्याच्यावरून उठून कादंबरीच्या नायकावर बसलं. पण चारपांच मिनिटांनीं तिनं साहजिकच वर पाहिलें तर तो तरुण परत तिथंच उभा होता. तिला वाटलं कीं आपणच द्यावी ओळख. चारदोन मिनिटं तशीच गेलीं तो मनाशीं कांहींतरी ठरवीत होता. रजनीच्या वरच्या बाजूला थोडी जागा होती. तिला बरं वाटलं. तो तिच्याजवळ गेला.

"मला जरा बसायला जागा देतां का?" त्यानं मंदस्मित करून प्रश्न केला.

"हो बसा ना" आपला ' होल्ड ऑल ' जरा खालीं ओढून त्याला जागा करून देऊन रजनीनं उत्तर दिलं.

बस्स! एवढंच संभाषण. तिच्याशीं एक चकार शद्बसुद्धां काढला नाहीं त्यानं.

तिला आश्चर्य वाटलं अन् रागहि आला त्याचा. तो विचारी मुद्रेनें पहात होता. इतक्यांत तो बोलला " तुम्ही × × × × ला उतरणार वाटतं ? "

" हो "

" तिथं कुणाकडे ? "

" आपलं नांव काय ? " थोडासा अनिच्छेनं पण वेगानं तो प्रश्न रजनीच्या तोंडून बाहेर आला.

" माझं नांव चंद्रकान्त भावे "

" तुम्ही मला ओळखतां का ? " वाक्य तोंडांतून गेल्यावर स्वतःचा राग आला रजनीला अन् जीभदेखील डाव्या बाजूला नेली तिनं.

" तुमचं नांव रजनी आपटे ना ? "

" हो. चवथीपर्यंत एका वर्गात होतों आपण. आठवतं का ? "

" हो " तो जरासा हंसला.

रजनीहि खुद्कन हंसली. तेवढ्यांत गालावर खळी पडली. गोड आठवण झाली तिला. मुलं तिला अन् चंद्रकान्ताला खूपखूप चिडवीत असत.

" आपण असे सामानाशिवाय कसे ? अन् हल्लीं करतां काय ? " रजनीचा धीर चेपत चालला.

" विल्सनला J.B A. ला आहें. बहीण आजारी आहे माझी—"

" कोण विमलाताई का ? "

" हो. तिच्या नवऱ्याची तार आलीय् म्हणून हा असाच निघालोंय् " सर्व हकीकत त्यानं सांगितली.

जुन्या आठवणी काढीत बसलीं दोघं. आजूबाजूला लोकांनासुद्धां जरा आश्चर्यच वाटलं. आत्तां हा गृहस्थ येतो काय ! लगेच इतकी ओळख झाली तरी कशी !

लाटा निर्माण करून त्यांमधून डुलत जाणाऱ्या बोटीसारखी झाली होती तिची स्थिति. 'मारुतीप्रमाणें आपली कुणी शंका घेतली तर ! आपल्या अंतरांतली मूर्ति दाखवूं जगाला.'

" चला, चहा तर पिऊं या. " त्यानें एवढं बोलून चपला घातल्या पायांत. तिनंहि तसंच केलं. पण त्यांचे पाय सहजच 'डेक'कडे वळले. चमत्कारिक

फेंसानं त्या अग्निनौकेला हंसणारा सागरराज. कडक तळपणारा तो दिनमणी. सभोंवतीं चमकणारं वर्तुलाकार क्षितिज. डाव्या बाजूला डोंगर. सारंच विचित्र होतं.

भर दुपारचा सूर्य डोक्यावर तळपतांना ही शोभा पहाणारांची 'हौस' मोठी विचित्र खरी.

मागच्या कठड्यावर दोन्ही कोंपरं ठेवून रजनी उभी होती. अन् चंद्रकांत तिच्या डाव्या बाजूला रेलिंगमध्यें चप्पल नि पाय अडकवीत होता.

दोन तीन वेळां दृष्टिभेट झाली. तिचे डोळे पायाकडे वळत व चंद्रकांताचे क्षितिजाकडे जात.

शेवटीं त्यानं एकदां हेतुपूर्ण दृष्टीनं तिच्याकडे पाहिलं. अन् तीच दृष्टि रजनीच्या नेत्रांत प्रतिबिंबित झाली होती.

रजनीनं लाजून खालीं पाहिलं.

नि खालीं येतांना—

भावनोर्मि इतक्या उचंबळल्या कीं क्षणभर तिचा हात त्याच्या हातांत आला.

एका अभूतपूर्व आनंदांत दोघांनीं गोड चहा घेतला.

* * * *

खालीं उतरून दोघं गाडी करून आपापल्या घरीं गेलीं. दुसऱ्या दिवशीं रजनी चन्द्रकान्ताच्या बहिणीकडे गेली. त्याची ओळख होतीच घरीं.

चन्द्रकांतानं कानाशीं तोंड नेत म्हटलं बहिणीच्या " त्या बघ रजनीबाई आल्यात् "

" कोण ह्या रजनीबाई " विमलाबाईंनी मागें पाहिलं " कोण पोरी तूं होय ! म्हणे रजनीबाई. "

सर्वांनीं पळापळ करून ताईंना मृत्युलोकांतून मृत्युलोकावर आणलं पण तेव्हांपासून चन्द्रकान्त जाण्याच्या गोष्टीच बोलेना. सांगे 'ज्युनिअर' आहे.

**त्याचं हें असं झालं—**

म्हणूनच चंद्रकांत अन् रजनी दोघंजणं फिरायला जात. माळरान म्हणजे त्यांचं आवडतं ठिकाण, कारण दुसरं कुणीच जात नसे तिकडे. भूतबाधेची दंतकथा होती त्यांत. मधून मधून समुद्रावरहि जात तीं कधींकधीं.

आज तीं नेहमींच्या ठिकाणीं येऊन बसलीं होतीं.

" किती सुंदर आहे नाहीं ! " प्रेमिकांना बोलण्याची कधींच वाण पडत नाहीं.

" त्यांत काय आहे विशेष ! नेहमींचंच " खट्याळपणें हंसत त्यानं उत्तर दिलं.

" उं " हातांतला खडा तळ्यांत टाकला रजनीनं. तिला वाटत होतं कीं आतां म्हणेल.

" चुकलों मी. " पण छे त्याचं लक्षच नव्हतं तो प्रत्यक्ष तिच्याकडेच पहात होता. रजनीनं भराभर खडे मारायला सुरवात केली. तरीसुद्धां तो लक्ष देईना, म्हणून रागानें ती दूर निघून गेली. एका आंब्याच्या झाडाखालीं आली.

अन् मागून धांवत येणाऱ्या चंद्रकांताला पाहून ती झाडाआड झाली.

" रजनी ए रजनी " तिचा पाठलाग करून त्यानं तिला पकडलें.

" रजनी " निश्चयी दृष्टीनं तिच्याकडे पहात चंद्रकांत म्हणाला " माझं अतिशय प्रेम आहे तुझ्यावर."

तिची कल्पनाच नव्हती. ती दचकली. पण सांवरून घेत ती म्हणाली,

" चंद्रकान्त, काय उत्तर देऊं मी तुम्हाला ! मीहि तुमच्यावर प्रेमच करतें पण—"

हताश रजनीच्या पणाला त्यानं पुन्हा प्रश्न केला "पण काय ? घरचीं माणसं का विरुद्ध आहेत ? "

" छे ! मी कुणालाहि फसवलं तरी त्यांची त्याला सम्मती आहे "

" म्हणजे तूं अपवित्र–पण छे सात्विक सौंदर्य अपवित्र असतच नाहीं "

अंतःकरण पिळवटून आल्यामुळं तिचा आवाज दुहेरी येऊं लागला होता.

" रजनी माझी रजनी—"

" चंद्रकान्त नाहीं हो. तें अशक्य आहे "

" कां ? कोण आपल्यामधें येत आहे ? "

" निसर्ग " आंब्याच्या बुंध्यावर डोकं टेकीत ती बोलली. बोलली कसली ! तोंडावाटे शब्द आले ते बाहेर.

झपझप पावलं टाकीत दोघं उतरूं लागलीं. नेहमीं परततांना त्यांच्या प्रेमाच्या

भार्षेत काळे पांढरे ढग, किलबिलणारीं पाखरं मूर्तिमंत निसर्ग असे. पण आज त्या निसर्गानंच त्यानां अडवलं होतं. गूढ विचारांत होतीं दोघं.

नेहमींचीच वेळ अन् नेहमींचंच ठिकाण. त्या ठिकाणाहून दोघं दोन दिशांना जायचीं. दोघांचे हात धरण्यास नी नेत्रांजनं ओवळण्यास विसरत नसत तीं पण आज — !

सहाजिकच दोघांचे हात एकमेकांच्या हातांत आले. पण ते नेत्र !

रजनी जवळ जवळ रडतच घरांत शिरली. जेवावयला नको म्हणून सांगून ती आपल्या खोलींत शिरली. हताशपणें तोंडावर रुमाल टाकून ती रडूं लागली. चंद्रकान्तालाहि अतीशय वाईट वाटलं. आपल्या दोघांच्या आड 'निसर्ग' आहे असं कळतांच त्याला प्रथम राग आला नन्तर 'कींव' आली. काय करावं त्यालाहि सुचेना. दुसरा दिवस उजाडला अन् पुष्कळ वेळानं मावळला असं वाटलं चंद्रकान्ताला. तो उगाचच फिरायला गेला होता. पण कंटाळून घरी आला. त्याच्या हातांत एक लहसं पाकीट दिलं त्याच्या बहिणीनें. लगबगीनें उघडून तो वाचूं लागला.

* * * *

दिनांक ५ जून

प्रिय चंद्रकान्त,

कालचा प्रसंग नसताच घडला तर ! काय लिहिणार मी ! आपले थोडे दिवस सुखांत गेले असते आणखी. पण पक्का रंग वाईटच. सत्य अचानक बाहेर आलं, तुम्ही मनांत केवढे डोलारे उभारले असतील या संसारी जगांत पण—

सत्य अचानक बाहेर आलं. जें सांगण्यापेक्षां जीव देणं बरं वाटेल माणसाला असं भयंकर सत्य तें. पण या क्षणापर्यंत माझ्या कुटुंबियांना नि मलाच माहीत होतं. चंद्रकान्त कसं सांगू हो मी तुम्हाला ! मी निसर्गानेंच अपूर्ण आहे.

आपलं गेलेलं रम्य जीवन वारंवार डोळ्यापुढं येतं. किती आनंद होता त्यांत ! घक्के कसलेहि असले तरी वाईटच. हृदयाला धक्का बसवणारं हें सत्य सांगायला कुणी भाग पाडलं !

कांहीं समजत नाहीं मला. कांहीं लिहवत नाहीं माझ्यानं. तुम्ही मला मृत समजा व एखाद्या सुस्वरूप सुस्वभावी मुलीशीं विवाह करून सुखी व्हा. मी पराभूत झालें आहे. अगदीं कायमची.

आतां मी परत जाणार आहें मुंबईला. जीव देण्याचं धैर्य—मनोनिग्रह—नाहीं माझ्यांत. जरा स्पष्ट लिहितें. इतके दिवस मी तुम्हाला का फसविलं ? मी अपूर्णा असलें तरी मलाहि भावना आहेत ना ! स्त्रीजीवनाप्रमाणं तरी-सुद्धां जगवता येईल अशी वेडी आशा आहे—होती—माझी. निव्वळ भावनावशत्व होतं तें. मला प्रेम करतां येत नाहीं हें विसरलें मी. पण काय करणार मी ! विश्वामित्रसुद्धां चुकलाच ना !

क्षमा करा मला. पुढं मागं कधीं गांठ पडली तर बोलाल ना माझ्याशीं ?

काय लिहूं इथं ?
आपली आपणच
**रजनी**

पत्राच्या वरच्या बाजूला लिहिलं होतं. 'पत्र फाडून टाका. माझी अब्रू—' पुढचं वाक्य अश्रूंनींच पुरं केलं होतं. त्यानं पत्र जाळून टाकलं.

त्यानं पुष्कळ विचार केला. अखेरीस प्रत्यक्ष भेटीपेक्षां पत्रच जास्त बरं म्हणून लिहून पोष्टांत टाकलं.

पुन्हां एक दिवस गेला.: दुसरा आला. रजनीला आपल्याकडे टपालवाला येतांना पाहून कांहीं वाटलं नाहीं पण स्वतःचं पत्र पाहिलं तिनं तेव्हां आश्चर्यंच वाटलं.

**रजनी मुकुंद आपटे**
**C/o मुकुंदराव आपटे**
**××××**

कोपऱ्यांत बारीक अक्षरांत लिहिलं होतं, 'चंद्रकांत भावे.'

तिला कल्पनाच करवेना. अमृताची अपेक्षा करावी अन् वीष बाहेर यावं मग ! आपल्या हातांनींच पत्र फोडून ती वाचूं लागली. आणि पहिलंच वाक्य

वाचून तिच्या नेत्रांतून दोन अश्रू आले व गालांवर ओघळले. गेल्या रात्रीचे शोकाचे होते, आतांचे आनंदाचे होते.

चंद्रकांतानें लिहिलं होतं—

प्रिय रजनी,

तुला काय सांगावं हें मलासुद्धां कळत नाहीं. पण एवढं खरं कीं हें पत्र मी पूर्ण विचार करून लिहीत आहें.

रजनी ! तूं मला पूर्णपणं ओळखलं नाहींस हेंच खरं.

सगळी हकीकत ऐकूनसुद्धां मी लिहीत आहें ' तूं माझी अर्धांगी आहेस. '

विवाह म्हणजे आयुष्यांतला मंगल प्रसंग ना ! जीवनांतले खांचखळगे ओलांडून जाण्यासाठीं जोडीदार मिळवायचा असतो ना तिथं. मग तुझ्या अपूर्णत्वाचा संबंध कुठं आला. मला नाहीं वाटत तसं.

मन हें दुसरं शरीरच म्हणतात लेखक. मग शरीरानं अपूर्णा असलीस तरी मनानं !

जग आपल्याला अडकवूं शकत नाहीं. निसर्ग आड येत नाहीं. फक्त स्वतःच्या कल्पनाच भिवडवीत असतात माणसाला.

उद्यां माळरानावर ये हं. मी वाट पहात आहें.

तुझाच
**चंद्रकांत**

रजनीनं आवेगभरांत पत्र हृदयाशीं धरलं.

—७—

# चंदनी पेटींतील झगा

सकाळच्या धूसर प्रकाशांत विहिरीवर येणारी देशमुखांची ती कृश मूर्ति दिसली म्हणजे विहिरीवर जमलेल्या माणसांचा गलबला लगेच बंद व्हायचा. आणि त्यांना पाहून पदर सांवरीत बाजूला होणाऱ्या मराठमोळा स्त्रियांकडे पहात देशमुख विहिरीवर जावयाचे.

मला त्या गांवाला जाऊन महिनाच झाला होता. माझी आणि देशमुखांची गांठ पडायची ती विहिरीवरच. मला पाहिल्यावर देशमुख थबकायचे आणि मला म्हणायचे, " मास्तर या एकदां आमच्या घरीं. "

आज वेळांत वेळ काढून मी देशमुखांच्या घरीं गेलों. म्हातारा वळकटीला पाठ टेकून आढ्याकडे निश्चल दृष्टीनें पहात पडला होता.

" काय चाललंय् ? " मीं आंत डोकावीत विचारलें.

" पडलोय् , या आंत ! " देशमुख माझ्या प्रश्नानें उठून बसले आणि सतरंजीचा एक कोंपरा माझ्यासाठीं त्यांनीं झटकला.

सतरंजीवर बसतां बसतां मीं माझी नजर चौफेर टाकली. भिंतीवर नाहीं म्हणायला एक बराच अस्पष्ट झालेला फोटो लटकत होता. मीं उठून तो फोटो पाहिला. एका पहिलवानी पेशाच्या तरुणाचा फोटो होता तो. " तुमचा वाटतं फोटो ? " मीं बसतां बसतां विचारलें.

" छे छे ! " थरारत्या दृष्टीनें देशमुख उद्गारले, " माझ्या एका बाळ-मित्राचा—उद्धवराव पाटील त्याचें नांव..."

देशमुखांची ती विकल अवस्था पाहून मीं फोटोविषयीं अधिक विचारलें नाहीं. पण देशमुखांना बरेंच बोलावेंसें वाटत होतें असें दिसलें. ते जागेवरून उठले आणि कपाटांतून एक सुंदर नक्षीची चंदनी पेटी घेऊन बसले. पेटी उघडून ते मला म्हणाले—" तो भिंतीवरचा माझ्या स्नेह्याचा फोटो आणि हें माझ्या बायकोचें स्मृतिचित्र. "

त्या पेटींत एक जीर्ण झालेला परंतु पांढरा स्वच्छ असा सहा–सात वर्षांच्या मुलीचा झगा होता. तो झगा पाहून आणि त्याविषयींचा देशमुखांचा खुलासा ऐकून माझ्या मनाचा अगदीं गोंधळ उडाला.

माझी भांबावलेली मनःस्थिती पाहून देशमुख म्हणाले, " माझी कथाच सांगतों तुम्हाला. मनांत कोंडलेलें दुःख दुसऱ्याला सांगून मन कसं मोकळं करावंसं वाटतं. कंटाळा नाहीं ना यायचा तुम्हांला ? "

" छे छे, मुळींच नाहीं " देशमुखांच्या आर्जवी मुद्रेकडे पहात मी म्हणालों.

जवळच असलेल्या तांब्यांतल्या पाण्याचे दोन घोट घेऊन देशमुखांनीं सुरवात केली आपल्या जीवनकथेला.

" ह्या फोटोंतला उद्धवराव पाटील आणि मी अगदीं बाळमित्र. हें पलीकडचें घर–तेंच पाटलांचें. उद्धवरावांचे वडील यादवराव गांवचे पाटील आणि आमचें देशमुखांचें घराणें. आमच्या घराण्याखेरीज मान्यांचें एक घराणें मोठें मानमरातबाचें होतें. त्यामुळें आमच्या तिन्ही घरांचा घरोबा चांगलाच होता. उद्धवराव, मी आणि मान्यांची मंजुळा तिघेंही कधीं नदीकांठीं, कधीं शेतांत खेळण्यांत गुंगलेलीं असावयाचीं. मंजुळा मान्यांची एकुलती एक लाडकी मुलगी. त्यामुळें ते मंजुळेला आमच्यांत येण्याविषयीं प्रतिबंध करीत नसत. शिवाय सोयरिकीच्या संबंधानें माने आणि पाटील यांचे संबंध जास्त दृढ होण्याचें घाटत होतें. पंधरा-सोळा वर्षांचे असूं त्या वेळेस आम्ही. मंजुळा बारा वर्षांची असावी बहुतेक. प्रेमबीम कांहीं कळत नसे आम्हांला. पण " नवरा बायको " म्हणून कुणी उद्धव आणि मंजुळेला चिडवलं कीं दोघेंही लाजत आणि गालांतल्या गालांत हंसत..."

देशमूख थोडा वेळ थांबले आणि परत पुढें सांगूं लागले, " पण माणसांनीं कितीही ठरवलें तरी परमेश्वराच्या मनांत जें असतें तेंच तो करतो. शेताच्या कांहीं भानगडीवरून मान्यांचे आणि पाटलांचें वांकडें आलें, तें इतकें कीं ठरलेली सोयरीक त्यांनीं मोडली, आणि माने माझ्या वडिलांशीं लग्नाचें बोलणें करूं लागले. मला कां कुणाला ठाऊक मनांतल्या मनांत फार आनंद झाला. मीं माझा आनंद उद्धवला सांगण्यासाठीं त्याच्याकडे गेलों. फार वाईट वाटलं त्याला माझी बातमी ऐकून. पण सगळ्यांमध्यें मोकळ्या मनानें खेळणाऱ्या

मंजुळेच्या कानावर आमचें बोलणें गेलें तेव्हां ती हिरमुसली तोंड करून तेथून निघून गेली, तेव्हां मात्र मला फार आश्चर्य वाटलें.

पांचसहा महिन्यांतच मंजुळा लौकिक विधीनें माझी झाली. तशी ती सर्वांशीं हंसत खेळत वागे. माझ्याशीं देखील. पण किल्ली दिलेलें यांत्रिक बाहुलें हंसतें तसें तें हास्य मला वाटे.

एकदां ती खिडकींत निश्चल दृष्टीनें लांबवर पहात उभी होती. मीं मागून तिचे मांसल दंड धरले, त्याबरोबर ती पदर सांवरून बाजूला झाली. ती काय पहात असावी या कुतुहलानें मीं खिडकींतून बाहेर पाहिलें. उद्धवराव आपल्या गड्यांशीं बोलत होता. मीं शांतपणानें माझी दृष्टि आंत ओढली. दिवाळीच्या दिवशीं उद्धवराव फराळाला आला होता. किती आनंदी दिसत होती त्या दिवशीं मंजुळा. वाऱ्याच्या झुळुकीनं जाईची कळी फुलावी त्याप्रमाणें दाराच्या फटींतून ती किती वेळ तरी उद्धवकडे पहात होती.

मी समजून चुकलों, मंजुळेचं हृदय उद्धवरावाचं आहे तें बळजबरीनं मिळणं शक्य नाहीं. तिची चूक कांहीं नव्हती. ती मला शक्य त्या तऱ्हेनें सुखी करण्याचा प्रयत्न करी. पण तिचं हटेल हृदय उद्धरावाकडे धांव घेई, त्याला ती तरी काय करणार? तिला आनंदी ठेवण्याच्या उद्देशानें मी उद्धवला वारंवार घरीं बोलवीत असे. त्याच्याशीं ती एक शब्दही बोलत नसे. पण त्याला एकवार पहाण्यानेंच तिच्या आनंदाला केवढें भरतें येई.

पुढें वर्षभरांत उद्धवरावांचंही लग्न झालं. उद्धवरावाच्या बायकोशीं बोलण्या-साठीं म्हणून मंजुळा आतां त्याच्या घरीं जात असे. उद्धवरावाचें दर्शन सुलभ व्हावें ह्यासाठीं तिनें आपल्या गोड वागणुकीनं उद्धवरावाच्या बायकोला अगदीं आपलीशी करून टाकली.

मध्यंतरीं देशमुखांनीं पाण्याचा एक घोट घेतला, “अशीं तीनचार वर्षे निघून गेलीं. उद्धवरावाच्या घरीं पाळणा हलूं लागला. त्याला मुलगी झाली. आम्ही मात्र त्या बाबतींत अभागी ठरलों. त्या मुलीमुळें मंजुळेचं त्या घराशीं चांगलेंच संघटण जमलें. त्या मुलीचे कपडे शिवणें वगैरे सारें काम ती फार हौसेनें करी. अप्रत्यक्ष रीत्या तिनें आपलें सारें जीवन उद्धवला वाहिलें.

उद्धवची मुलगी–निर्मला नांव ठेवलं होतं तिचं–बोबडे बोल बोलूं लागली होती. ती मंजुळेला काकी म्हणावयाची. तिनं 'मंजुळाकाकी' म्हणून हांक मारली कीं मंजुळेचें सारें शरीर पुलकित व्हायचें. ती पोरगी तरी अशी लबाड–तिला मंजुळेनें शिवलेल्या कपड्याखेरीज कपडे आवडायचे नाहींत. आतां ती झगे घालूं लागली होती. पांढऱ्या कापडाचे काळी लेस लावलेले झगे तिला फार आवडत.

धंद्याच्या निमित्तानं उद्धवराव मुंबईला जाण्यास निघाला होता. माझा निरोप घेण्यासाठीं तो आला. काय असेल तें असो, जातांना त्याच्या डोळ्यांत चटकन् पाणी उभं राहिलं. मलाही वाईट वाटलं जरा.

मुंबईला त्याच्या धंद्याचा जम चांगला बसला. तिथें मुद्दाम काढून घेतलेला एक फोटो त्यानें मला पाठवला. हाच तो फोटो." देशमुखांनीं फोटोकडे पाहिलें आणि परत सुरवात केली आपल्या हकिगतीला. " धंद्याचा जम बसला पण धंद्याच्या दगदगीनं म्हणा अगर मुंबईची हवा म्हणून म्हणा त्याची प्रकृतीची तक्रार वाढत्या स्वरूपांत प्रत्येक पत्रांतून येऊं लागली. मंजुळा त्याला पत्र धाडण्याविषयीं नेहमीं मला सांगायची. एक दिवशीं तारच आली. उद्धवराव अत्यवस्थ स्थितींत हॉस्पीटलमध्यें होता. आम्ही सर्वजण मुंबईस गेलों. उद्धवराव आमचा शेवटचा निरोप घेण्याचीच वाट पहात होता. त्याची जीव–ज्योति त्याच्या नेत्रांतून मावळल्याबरोबर दुःखाचा कल्लोळ पसरला. मंजुळेनें उद्धवरावाच्या मुलीला–निर्मलेला–पोटाशीं धरून आपल्या अश्रूंना मुक्त वाट दिली. "......" आतां मंजुळेचें एकमेव आनंदस्थान म्हणजे निर्मला होती, तरी उद्धवराव गेल्यापासून ती अधिक कष्टी दिसूं लागली. मनानें आणि शरिरानें देखील. हळूहळू तिचा उदासीनपणा वाढूंच लागला.

नागपंचमीचा दिवस होता. निर्मला नाचत नाचत आमच्या घरांत आली. " मंजूकाकी, मंजूकाकी " म्हणून हांकेचा सपाटा चालवला तिनें. मंजुळा स्वैंपाक घरांत होती. निर्मला घरांत गेली, आणि मंजुळेच्या खांद्यावर एक हात ठेवून आणि एका हातानें तिची हनुवटी धरून तिचें तोंड आपल्याकडे करीत निर्मला तिला म्हणाली, " मंजुकाकी आज नाग–पंचमी...झगा हवा मला...

नवा नवा." तिचा गालगुच्चा घेत मंजुळा "बरं बरं!" म्हणाली. त्या दिवशीं एकसारखं बसून एका बैठकींत निर्मलेचा झगा शिवला तिनं. तो घेऊन निर्मला किती आनंदानें नाचत गेली. चारा मिळाला म्हणजे पांखरें चिवचिवाट करतात ना त्याप्रमाणें. त्या दिवशीं मंजुळेला बराच थकवा आला.

दिराशीं पटेना म्हणून निर्मलेची आई निर्मलेला घेऊन मुंबईला भावाकडे रहावयास गेली. जातांना पुढच्या नागपंचमीस झगा पाठविण्याचें वचन मंजुळे-कडून घेण्यास निर्मला विसरली नाहीं.

मंजुळेनें बरेच दिवस आपलें दुखणें अंगावर काढलें. पण अखेर धरावंच लागलं तिला अंथरूण. दिवसेंदिवस ती अधिकाधिकच खंगत चालली. घरां-तल्या घरांत चालण्याचें त्राणही तिच्या पायांत राहिलें नाहीं. सातआठ महिने निघून गेले. चौरंगावर केलेली दिव्यांची पूजा पाहून चार दिवसांवर आलेल्या नागपंचमीची आठवण झाली तिला. ती मला म्हणाली, "निर्मलेला नाग-पंचमीला झगा पाठवायचा आहे." मंदस्मित तिच्या फिक्कट चेहऱ्यावर कसं विलसत होतं. "शिंप्याकडून शिवून घेऊन कुणाबरोबर तरी पाठवावा." मी म्हणालों. यावर माझ्याकडे रागाचा एक कटाक्ष टाकीत मंजुळा म्हणाली, "छे छे निर्मलेला आवडणार नाहीं तो. पांढरी मलमल आणि काळी लेस द्यावी... मी शिवीन झगा—तो स्वतः नेऊन द्यावा." मीं मुकाट्यानें कापड आणून दिलें. त्या वेळेस कुठून उसनें अवसान आणलें तिनें कुणास ठाऊक ? पण तीन दिवस बिछान्यावर बसून झगा पुरा केला तिनें.

निर्मलेच्या मामाचा पत्ता माहीत असल्यानें मी नागपंचमीच्याच दिवशीं मुंब-ईला मामाच्या घरीं गेलों. निर्मला आपल्या मामेभावंडाबरोबर रंगली होती. किती सुधारली होती ती. तिच्या मामानें माझें स्वागत केलें व निर्मलेच्या आईला त्यानें बाहेर बोलावलें. मीं औपचारिक बोलल्यानंतर निर्मलेच्या आईनं निर्मलेला बोलावलें आणि सांगितलें "निर्मला तुला मंजूकाकीनं झगा पाठवला आहे." मंजूकाकीचं नांव ऐकल्याबरोबर निर्मलेची कळी खुलली पण "झग्गा इश्श..." हे तिच्या मामे-बहिणीचे शब्द ऐकून ती कावरीबावरी झाली. तशांत मीं झगा बाहेर काढतांच सगळींच मुलं तिला चिडवूं लागलीं आणि मोठ्यानें हसूं लागलीं. तेव्हां मला

असला झगा नको जा" असं म्हणून निघून गेली. या तिच्या शब्दांनीं मला फार वाईट वाटलं. मनांत आलं कीं, निर्मलेनें झगा घातला असेल ह्या आनंदांत ह्या वेळेस मंजुळा असेल. माझ्या मनाच्या या व्यग्रस्थितीवर..."मंजुकाकीला म्हणावं निर्मला आतां फ्रॉक घालते–झगा नाहीं." या निर्मलेच्या आईच्या वाक्यानं चांगलंच लिंपण बसलें.

निर्मलेच्या निरोपासाठीं मंजुळा किती आतुरतेनें वाट पहात होती. माझी खिन्न मुद्रा पाहून ती म्हणाली, "काय म्हणाली निर्मला?" मी न बोलतांच झगा दिला तिच्या हातांत. "कां घेतला नाहीं तिनें?" मंजुळेनें शांतपणानें विचारलें.

"हं ती फ्रॉक घालते आतां–झगा नाहीं." मीं उत्तर दिलें.

यावर मंजुळा आपल्याशींच खिन्नपणानं हंसत म्हणाली, "हं चुकलं माझं... आतां ती मोठी झाली असेल...शिकत असेल......मुंबईची हवा ती... मोठी सुधारली असेल लबाड...आतां तिला झगा कसा चालेल? मंजुळेनें तो झगा आपल्या वक्षस्थलावर दाबला......"

देशमुख सावध झाल्यासारखे झाले. त्यांनीं त्या चंदनी पेटींतला झगा माझ्या-पुढें धरला आणि मला म्हणाले, "मास्तर हाच तो झगा. ह्या पांढऱ्या झग्या-वर माझ्या मंजुळेचं जीवनचित्र कसं स्पष्ट उमटलं आहे. तें तुम्हाला दिसायचं नाहीं. त्या झग्याकडे पहात बसलं म्हणजे मला माझ्या एकाकी जीवनाचा विसर पडतो. अशीं वीस वर्षें काढलीं मीं. अजून किती दिवस देव काढायला लावतो कुणास ठाऊक!" असें म्हणून देशमुखांनीं आपली पाठ वळकटीला टेकली.

—८—

# तारका

—ती एक तारका होती.

—सौभाग्यवती असूनही ती नाटकधंद्यांत पडली होती.

—प्रसंग पडला म्हणून तिनें या धंद्यांत पदार्पण केलें नव्हतें, तर तिला या कलेची लहानपणापासूनच आवड होती.

—रंगभूमीवर निरनिराळ्या कंपन्यांतून, क्लबांतून, स्नेहसंमेलनांतून तिनें उत्कृष्ट भूमिका केल्यामुळें ती बरीच नांवारूपास चढली होती.

—तिचें सौंदर्यही तसेंच वाखाणण्यासारखें !

—अनुपम सौंदर्य, उत्कृष्ट अभिनय आणि वागण्यांतील मोहक-मोकळेपणा या त्रिवेणी संगमामुळें प्रत्येक क्लबाला, कंपनीला, तिनें आपल्याकडेच कायम रहावें असें वाटत असे.

—परंतु ती कायम अशी कोठेंही राहिली नाहीं.

—नाटकांतून ती मुख्य नायिकेची भूमिका करी.

—तिच्याबरोबर नायकाची भूमिका करण्याचा मान मिळावा म्हणून नटांची कोण धडपड !

—आतांपर्यंत निरनिराळ्या पुष्कळशा नटांबरोबर तिनें भूमिका केल्या.

—प्रत्येकाला तिच्याविषयीं आपलेपणा वाटे.

—ती नाटकांत भूमिका करायला असली कीं, तालमीच्या वेळीं सभासदांची, मित्रांची कोण गर्दी असायची तिथं !

—एरवीं नुसता शुकशुकाट असायचा.

—एकदां एका क्लबांतल्या नवीन नाटकांत तिनें मुख्य भूमिका केली.

—नाटकांतील नायकाचें काम करणारा क्लबांतीलच एक घटक.

—त्यानेंही आपली भूमिका उत्तम वठवली.

—निरनिराळ्या वृत्तपत्रांतून दोघांच्याही स्तुतीनें रकानेच्या रकाने भरून येऊं लागले.

—नाटकाचे प्रयोगही धुमधडाक्यानें सुरू झाले.

—'हाउस फुल्ल' च्या पाट्या थिएटरवर झळकूं लागल्या.

—ज्या क्लबाचें अस्तित्वही लोक विसरले होते त्याच क्लबाचा आज जिकडे तिकडे बोलबाला चालला होता.

—त्याला कारण म्हणजे ती तारका आणि तो तरुण नट.

—जसजसे प्रयोग होत गेले तसतसा त्यांचा संबंधही फार येऊं लागला.

—पुढें पुढें त्याच्यानें तिच्याशिवाय क्षणभरही राहणें अशक्य होऊं लागलें.

—कांहीं ना कांहीं निमित्त काढून तो तिच्या सहवासाची भूक शमवित होता.

—परंतु त्याच्यानें आतां राहवेना.

—त्याच्या हृदयांत एक नवीनच संवेदना निर्माण झाली होती.

—चिर सहवासाची त्याची आकांक्षा बळावत चालली.

—तिला कांहींच कल्पना नव्हती.

—तिचा मोकळेपणा कायमच होता.

—अलीकडे त्याचें कोठेंच लक्ष लागेना.

—त्याच्या भूमिकेंतील समरसता बरीच कमी होऊं लागली.

—दिग्दर्शक ओरडूं लागले.

—सर्वांनीं 'स्वारी चळली' असा शेरा मारला.

—तिनेंही त्याला एकदां तसेंच विचारलें.

—तो बोलला नाहीं, परंतु नुसता हंसला.

—या संधीचा फायदा घ्यायचा त्यानें ठरविलें, परंतु त्याच्या तोंडांतून शब्दच बाहेर पडेनात.

—असेच कांहीं दिवस गेले.

—शेवटीं त्यानें मनाचा हिय्या केला आणि एके दिवशीं आपलें हृदय तिच्या पुढें उघडें केलें.

—तिला तें ऐकून धक्का बसला नसला तरी आश्चर्य वाटलें खास !

—तिनें त्याला आपण विवाहित असल्याचें बजावलें.

—त्याला तें माहीत असूनही त्यानें आपलेंच घोडें पुढें दामटलें.

—' तुझ्या प्राप्तीशिवाय हा जीव जगणें आतां अशक्य आहे,' असेंही सांगायला त्यानें कमी केलें नाहीं.

—' नाट्यसृष्टींतील नाजूक शब्दांचा नाटकांतील पात्रांवर परिणाम होतो. सत्यसृष्टींतील व्यक्तींवर होईलच असें नाहीं. ' तिनें सांगितलें.

—' मला तुझें प्रेम पाहिजे आहे. ' तो.

—' मग तें तर आहेच आपल्यावर. ' ती.

—' माझ्याशीं इतका वेळ विनाकारणच कठोर वर्तन केलेंस म्हणायचें ?' तो.

—' म्हटलें पहावी परीक्षा करून. ' ती.

—' मग उतरलों परीक्षेंत ? ' असें म्हणून तो तिला जवळ ओढण्याकरितां आपल्या डाव्या हाताचा विळखा तिच्याभोवतीं घालणार तोंच—

—' हां खबरदार. ' ती कडाडली.

—तो चटकन् मागें सरकला.

—तिची मुद्रा पाहून त्याला भीति वाटली.

—तरी पण तो आशावादी होता.

—' फिरून यत्न करून पहा ' हें ब्रीदवाक्य तो विसरला नव्हता.

—त्यानें प्रयत्नाला सुरवात केली.

—' लाडके, अजून थट्टा संपली नाहीं का ? माझ्यावर तुझें प्रेम आहे ना ?' तो जरा लगट करून म्हणाला.

—' होय आहे ना. ' ती.

—तो आनंदला.

—मनांतल्या मनांत त्यानें परमेश्वराचे आभार मानले.

—' पण–' ती.

—' पण ? अजून पणच ? ' तो.

—' तुमच्यावर माझें प्रेम आहे पण तें–' ती.

—' बोल, लाडके बोल. अगदीं संकोच धरूं नकोस ' तो अधीरतेनें म्हणाला.

—' तें बंधुप्रेम आहे. '

—' बंधुप्रेम ? ' वज्राघात झाल्याप्रमाणें तो तरुण कोलमडून पडला.

— तारका त्याच्याकडे पहात राहिली.

-९-

# सलणारें शल्य

टेकडीच्या अगदीं माथ्यावर जाऊन पोहोंचायचा बेत केला असल्यानें आम्ही त्या दिवशीं बरेच लौकर निघालों.

मला ती टेकडी फारच आवडली होती. दिवाळीच्या सुट्टींत म्हणून आम्ही फार दिवसांनीं सावंतवाडीला आलों होतों. आणि त्यांची आवडती जागा म्हणून ते मला पहिल्यांदा मोर डोंगरीवरच फिरायला घेऊन गेले होते. किती किती सुंदर होतें तें स्थान !

चोंहों बाजूंनीं वाढलेलीं काजूचीं टुमदार छोटीं छोटीं झाडें—त्याच्यावरील पायथ्यापासूनच दिसणारा, माथ्यावरील मोठाला शीलाखंड आणि त्यावर दाट सावली धरणारा आणि सदा हिरवागार रहाणारा सांतविणीचा मोठाला वृक्ष ! जणूं यशोदुर्गाच्या माथ्यावरील सिंहासनावरचें छत्रच !

खालून तो देखावा पाहून मी वेडावून गेलें. राजाबाई टॉवरेपक्षां कितीतरी पटीनें अधिक उंच टेकडी होती ती. तेथें आपण गेल्यावर बाजूच्या रस्त्यांनीं फिरणारीं माणसें आपल्याला बाहुलीसारखीं दिसतील, आपण त्यांना माकडासारखे दिसूं ही कल्पना मला फारच आवडली.

टेकडी चढून जाण्याचा आनंद कांहीं निराळाच. मला त्या गोष्टीचा पूर्वी अनुभव नव्हता. त्यांना वाटलें मी कदाचित् दमून जाईन. पण झुडपांतून जाणाऱ्या वळणावळणाच्या अरुंद वाटेला लागतांच मला वाटलें आपण लपंडाव खेळत आहों. आणि अगदीं अल्लडपणें पळतच मी त्यांच्या अगोदर वर जाऊन पोहोंचलें.

आणि माझ्या आनंदाला टेकडीच्या सौंदर्याशिवाय आणखीहि एक कारण होतें. कारण विजयांना मी टेकडीच्या अगदीं माथ्यावर जावयाचा बेत सांगतांच ते कांहींच प्रतिकार न करतां म्हणाले होते,—

—विद्या, दमशील तूं वर जाईपर्यंत. फार उंच आहे ती टेकडी.

आणि नंतर उगाच एकदोन क्षण थांबून तेच पुढें म्हणाले होते—

—पण जाऊं याच एकदां आपण तिथें—

आणि त्यानंतर त्यांना निराळाच आनंद झालेला दिसला. मीं त्या वेळींच त्यांच्या त्या वागण्याबद्दल आश्चर्य व्यक्त केलें. पण माझें कसेंबसें समाधान करण्याएवढी चलाखी त्यांच्या ठिकाणीं होतीच.

ते म्हणाले,

—अग, मला फार आवडते ती जागा. तारुण्यारंभाच्या अनेक सायंकाळच्या वेळा मीं त्या ठिकाणीं घालविल्या आहेत. माझ्या आयुष्यांतील किती तरी आठवणी ह्या ठिकाणीं गुंफल्या आहेत आम्ही—

आणि कां कुणास ठाऊक. ते इथें एकदोन क्षण दचकले व पुढें म्हणाले, मित्रांमित्रांनीं जमून अनेकदां त्या ठिकाणीं गुजगोष्टी केलेल्या आहेत. म्हणून तिथें जावेसें वाटतें मला नेहमीं.

त्यांना वाटलें माझ्या ध्यानांत तें अडखळणें आलें नसावें. पण तेवढ्याच स्पष्टपणें तें माझ्या लक्षांत आल्यावांचून राहिलें नाहीं.

आणि त्याला कारणेंही तशींच होतीं. ते पूर्वींही अनेकदां असेच अडखळले होते. मला ते सारे प्रसंग आठवले—

लग्नानंतर मी घरांतले फोटो पहात होतें. त्यांचेच बरेचसे फोटो व मित्राचे चारदोन फोटो होते तिथें—पण त्यापेक्षां दुसऱ्या एका फोटोनें माझें लक्ष जास्त वेधून घेतलें. एका सुंदर तरुणीचा फोटो होता तो—

मीं त्यांना त्याबद्दल विचारलें तेव्हां ते म्हणाले—

—माझी बहीण आहे ती. गरीब बिचारी अकालीं सोडून गेली. आम्ही त्या वेळीं—

मला वाटलें त्यांना बहिणीच्या आठवणीनें दुःख होत असावें. मात्र मला ती त्यांची बहीण ही कल्पनाच पहिल्यांदा पटेना. दोघांच्या चेहऱ्यांत काडीचेंही साम्य नव्हतें. मला ती गोष्ट जाणवली. पण कदाचित् अगदीं भिन्न चेहऱ्यांचींही

भावंडें असूं शकतील असें मनाचें समाधन केलें मीं. पण तो प्रसंग मात्र माझ्या चांगलाच ध्यानांत राहिला. कारण त्यानंतर कांहीं वेळ ते बरेच अस्वस्थ होते.

आणि त्यानंतर चारपांच महिन्यांनीं घडलेली गोष्ट. मी त्या दिवशीं कॉलेज-मधून दोन तास लौकर घरीं आलें. कारण ते आज घरींच राहिले होते.

मी एवढ्या लौकर घरीं येईन याची त्यांना अर्थात्‌च कल्पना नव्हती.

तारुण्यात प्रेमाच्या अल्पशा जलसिंचनानेंसुद्धां प्रणयाची वेल लौकर फोफावत असावी—मला या वेळीं कांहीं तरी गंमत करावीशी वाटली.

मला आठवलें—

—परवां विजय असेच अनपेक्षितपणें लौकर घरीं आले होते. मी त्या वेळीं खांडेकरांची 'त्याचे अश्रू' ही ताजी लघुकथा वाचीत बसलें होतें. वाचतां वाचतां आपणांला झोंप लागली होती.

नि नंतर त्यांनीं त्या लघुकथेंतील आनंदासारखेच आपले ओंठ माझ्या ओठावर ठेविले व हळुवार गुदगुल्यांनीं आपणांला जागें केलें.

हें आठवतांच मलाही वाटलें आपण तसेंच कांहीं करावें. विजय झोपले नसेनात का?—कुठेंही असले तरी सांपडेल तेथें त्याचें चुंबन घ्यावें.

म्हणून मी हळूंच घरांत शिरलें. विजय अर्थात आंतल्या खोलींत पलंगाजवळ असणार अशी कल्पना करून मी तिकडे गेलें.

पण माझी ती कल्पना खोटी ठरली.

मला आंतल्या खोलींतून दिवाणखान्यांत जावें लागलें.

पण—!

तेथें जातांच माझ्या कल्पनेप्रमाणेंच माझ्या आशाही फुकट गेल्याचें मला दिसून आलें.

कारण विजय हॉलमधें होते खरे, पण ते रडत होते. त्या तरुणीच्या फोटोकडे पहात असतांना त्यांची तशी स्थिति झाली होती.

मी आल्याची त्यांना जाणीव नव्हती.

ते म्हणाले.

—सुमा, आपली ओळखच झाली नसती तर—

मला आश्चर्य वाटलें. कुतुहल वाटलें. मी अगदीं हालचाल बंद करून उभी राहिलें. मला वाटलें ते आणखी कांहीं तरी बोलतील—

पण तसें क़ांहींच झालें नाहीं. उलट कसें कुणास ठाऊक. पण मी आल्याचें त्यांना कळलें—

त्यांनीं मागें वळून पाहिलें. ते जरासे दचकलेच पण बेमालूमपणें आपले अश्रू पुसून ते म्हणाले,

—काय कंटाळा आला होता पण एकटेपणाचा अन् त्यामुळें ताईची आठवणही झाली सहज. तूं आज लौकर आलीस वाटतें. आतां संध्याकाळ मजेंत घालवूं आपण.

आणि मग चार मिनिटांनीं पाहिलें असतें तर 'ते विजय हेच' असें कोणाला सांगतां आलें नसतें. आणि ती संध्याकाळही खरोखरच मजेंत गेली. पण मला मात्र त्या फोटोचें आणि त्यांचें कांहीं तरी वेगळें रहस्य असावें असा संशय आला आणि त्यामुळें मी बेचैन झालें मधून मधून.

आणि नंतरही असे चारदोन प्रसंग आले त्याच्यावरून मी त्या फोटो-विषयीं कांहींतरी कल्पना बांधूं शकलें—

पण मीं त्यांना महत्त्व केव्हांच दिलें नाहीं. कारण माझ्या सहवासांत विजयनीं त्या फोटोविषयींच्या भावना कधींच उचंबळूं दिल्या नव्हत्या. त्यांच्या नियंत्रण-शक्तीची कमाल होती ती.

मीं एक दोनदां त्यांना ओघांत आणण्याचा प्रयत्न केला, पण त्या बाबतींत त्यांनीं मला दाद दिली नाहीं. ते मला त्या बाबतींत विश्वासांत घेऊं शकले नाहींत. हें पाहून मींही तो नाद सोडून दिला. कारण त्याच्यामुळें मला कांहींच त्रास होत नव्हता. ते माझ्यापासून मुळींच दूर होत नव्हते—

मला वाईट वाटे तें एवढ्याचबद्दल. माझ्या इतक्या दिवसांच्या परिचयानेंही त मला विश्वासाला पात्र समजत नव्हते. त्या आठवणीला तोंड फोडीत नव्हते. त्यांना रडायला लावणारी ती आठवण दुःखदायक असावी—तिचा जाच ते सहन करीत होते—

'सलणारें शल्य काढून टाकणें चांगलें' हें का त्यांना कळत नव्हतें?—पण—

असें अनेकदां घडतें जगांत.

आणि शेवटीं मीं ठरविलें कीं तिचा जाच दुस्सह झाला म्हणजे आपोआपच जखम समोर धरतील ते माझ्या—

आणि यामुळें आज ज्याअर्थी जुन्या आठवणींचा संबंध लावून ते टेकडीवर जायला औत्सुक्यानें तयार झाले त्याअर्थी तेथें कांहीं तरी विशेष स्मृति गुंफल्या गेल्या असाव्या आणि कदाचित् त्याची आज जाणीव करून घेण्याची त्यांची इच्छा असावी असा तर्क केला मीं.

आज कांहीं झालें तरी ते कांहीं तरी बोलतीलच, नाहीं तर आपणच त्यांना बोलायला लावायचें असें मीं मनाशीं ठरविलें—

आणि यामुळेंच मी नाचत बागडत टेकडी चढत होतें.

पण त्या पायवाटेनें वर गेलें आणि माथ्यावर पोहोंचतांच त्या खडकाकडे पाहिलें मात्र—

तेथें अगोदरच कोणीतरी जाऊन बसलें होतें. तिच्या पाठमोऱ्या पण सुट-सुटीत दिसणाऱ्या आंगलटीवरून ती एक तरुण स्त्री असावी असा मीं तर्क केला.

तिचा मला राग आला. त्यांचें रहस्य समजून घ्यायचा मीं प्रयत्न करावा आणि त्या प्रत्येक वेळीं कांहीं तरी विघ्न यावें याचें मला वाईटही वाटलें.

मी थबकून जागच्याजागींच उभी होतें.

तोंच विजय एकदम मागाहून आले आणि म्हणाले,

—चल की थांबलीस कां ? कीं दमलीस उड्या मारून. तरी मीं म्हटलेंच होतें–तें पहा खडक अन् हीच वाट–कीं उचलून नेऊं—!—

पण त्यांनीं खडकाकडे बोट दाखविण्यापूर्वींच त्यांची नजर खडकाकडे गेली. तेथील व्यक्तीनें हे शब्द ऐकून मागें वळून पाहिलें—

आणि—

—कोण ! सुमा—!—

त्यांच्या तोंडून विवशपणें उद्गार निघाले.

—कोण ! विजय !—

ती व्यक्तिही तेवढ्याच आश्चर्यानें उद्गारली.

मीहि आश्चर्यानें पाहूं लागलें. ती व्यक्ति म्हणजे दुसरी तिसरी कोणी नसून फोटोंतील त्यांची दिवंगत बहीण होती.

शक्य असल्यास मीं त्या वेळीं तेथून निघून जाणें अत्यावश्यक होतें, पण त्या दोघांनींही लगेच स्वतःला सांवरून हास्यवदन केलें. त्यामुळें स्वतः निघून जाऊन विजयांना मला आलेल्या संशयाची जाणीव देणें मला इष्ट वाटेना.

मी तिथेंच बसलें.

आम्ही पुष्कळ कांहीं तरी बोलत होतों, पण त्यांत जिवंतपणा कांहींच नव्हता. न्यायाधीशापुढें दोन खुनी माणूस बसविले कीं त्याच्या बोलण्यांत जो चमत्कारिकपणा परिस्थितीनें येणें शक्य आहे त्याचा अनुभव घेण्याशिवाय कांहीं केलें नाहीं आम्हीं.

योग्य वेळीं आम्ही घरीं परतलों. जातांना सुमानें आम्हांला आपणाकडे येण्याचें आमंत्रण दिलें. आम्हीही ' हुं ' म्हटलें—

त्यांना एक प्रकारची उत्कंठा वाटत होती. पण त्यांच्यापेक्षां मला ती जास्त वाटत होती. कारण एवढे दिवस न सुटलेलें कोडें आतां सुटणार अशी मला खात्री वाटत होती.

रात्रीं घरीं पोंहोंचल्यावर विशेष कांहीं झालें नाहीं !

पण जेवण आल्यावर ते म्हणाले,

—विद्या चांदणें किती सुंदर पडलेंय् बघ. बाहेर जाऊन येऊं या जरा.

त्यांचा हेतु मला समजला. त्यांच्या बोलण्याचीही गंमत वाटली. आणि त्यांना वाटलें होतें तसेंच आणि हवें होतें तेंच उत्तर मी देऊन टाकलें.

मी म्हणालें,

—नको गडे आज फार दमलेंय् मी. आपणच जाऊन या ना.

आज एवढ्याच परवानगीमुळें ते जातील अशी माझी कल्पना होती आणि ते गेलेच.

मला आनंद झाला—

किती दिवसांचें गूढ आज उकलणार होतें. त्याच्यामुळें आमच्या संसारांत दुःख खास उत्पन्न झालें नव्हतें. कारण मला त्यांच्या परिस्थितीची कल्पना

आली असली तरी मी त्यांना दोषी न मानतां उलट त्यांच्याबद्दल आदर बाळगूं लागलें होतें.

कारण त्यांचें आत्मनियंत्रण किती दांडगें होतें ! माझ्या सुखाची काळजी केवढी तीव्र होती ! मग मीं त्यांना कां दोष द्यावा ?

पण त्या रहस्यामुळें त्यांना आनंद होत नव्हता. एकादें कूस कोठेंतरी मोडलेलें असावें आणि त्याला हात लागतांच तें सलावें तसे त्यांचे संबंध झाले होते. मी त्यांना त्याबद्दल मदत करायला तयार होतें. पण ते ती घेऊं शकत नव्हते.

मला त्यांचें रहस्य कळल्यावर माझा आनंद लोपेल अशी त्यांची कल्पना असावी. त्यांनीं मला ओळखलें नव्हतें. आणि यामुळंच त्यांना दुःख होत होतं.

पण आतां त्याची त्यांतून मुक्तता होणार होती आणि त्यामुळंच मला आनंद झाला. ते लौकर परत येणार नाहींत याची मला खात्री होती. तरी मी त्यांची वाट पहात होतें.

खिडकींतून बाहेरचा देखावा किती सुंदर दिसत होता.

आकाश निरभ्र चांदण्यांनीं भरून गेलें होतें. मध्येंच चंद्र प्रकाशत होता. एकाद्या रत्नजडीत पेल्यांतून पांढऱ्या शुभ्र दुधाची धार ओतली जावी तसें चांदणें चहुंकडे पडलें होतें. दिवाळीचे दिवस असल्यान सारीं शेतें अगदीं मोकळीं होतीं. हंगामांत कणसें कापून नेल्यावर उरलेले खुंट अजून पूर्णपणें सुकले नसल्यानें चंद्रप्रकाशांत चमकत होते. दूरवर कुठेंतरी झाडें चांदण्यांत न्हाऊन निघत होतीं. हिंवाळी भाजीवाल्यांच्या शेतांतून मधेंच एकादें वटवाघूळ उडत होतें. त्याच्या पंखाचा आवाज येत होता. वारा अगदीं पडला होता—

खिडकींत बसून इकडे पहातां पहातां मला केव्हां झोप लागली तें कळलेंच नाहीं.

पण गाढ झोप लागणें शक्यच नव्हतें.

मनावर आनंदाचा, औत्सुक्याचा चांगलाच ताण पडला होता. आणि जागी झालें तींही त्याच विचारांत.

खोलींत अद्यापि दिवा होता—

मी नीट जागी होऊन पाहिलें. माझी कल्पना खरी ठरली होती.

सुमाचा फोटो पुढ्यांत घेऊन ते कांहींतरी लिहित असावे.

आतां ते कांहीं लिहीत नव्हते, पण त्यांनीं डायरीचें पान लिहिलें असावें असें वाटलें मला.

मी त्यांच्यामागें जाऊन उभी राहिलें.

ती डायरीच होती. पण त्यांची नेहमींची डायरी नव्हती.

मला नवल वाटलें.

त्यांनीं सुमासाठीं एक वेगळी डायरी ठेविली असावी. मग ती आतांपर्यंत मला कशी दिसली नव्हती !—

मी वाचूं लागलें—

—सुमा, शेवटीं आपल्या आयुष्याची लघुकथाच घडली एक. तूं मेलीस अशी त्यावेळीं खात्री पटली नसती तर–? पण आतां काय त्याचें !–असो !–

—आपला दोघांचाही दोष नाहीं त्याच्यांत. खऱ्या गोष्टीच तशा घडल्या. तुझी मात्र खरोखरीच अन्य आहे. किती लौकर तूं तुझ्या मनावरील माझे पाश तोडूं शकलीस ! आणि स्वतः सुखी होऊन इतरांना सुखी केलेंस—

—नाहींतर मी. खरोखर सुमा तुझ्या क्षमेसाठीं झुरतांना मी माझ्या देवतेचा गुन्हा केला आहे. ती कशी आहे याची तुला कल्पना नाहीं. इतक्या आनंदानें आणि मोकळेपणानें ती माझ्याशीं वागली नसती तर माझें काय झालें असतें. एकही दिवस तिनें संशय घेतला नाहीं माझा—

—आणि मी मात्र त्याची तशी फेड केली नाहीं.

—पण आतां तूं क्षमा केलीस हें कळल्यावर निर्धास्त झालों मी. तुझ्या प्रेमाच्या ऋणांतून सुटलों. आतां दुसरा गुन्हा सुधारणार आहें मी. तिची क्षमा मागून अगदीं एकदां खऱ्या विश्वासानें तिच्या छातीवर मान टाकणार आहें मी.

—ती क्षमा करील कीं नाहीं ही शंका कशाला ! ती किती चांगली आहे—किती उदार मनाची आहे—अगदीं देवतेप्रमाणें...

आणि ते इथें थांबले होते...

ते पुन्हां कांहीं लिहिणार असें दिसतांच मी म्हणालें.

—झाली एवढी स्तुति मला पुरे होईल.

त्यांनीं संथपणें वळून पाहिलें. ते तसेच उठले व म्हणाले,

—क्षमा कर मला. तुझ्यापासून अनेक गोष्टी चोरून ठेवल्यायत् मी.

पण त्यांना बोलूं न देतां मी म्हणालें,

—सांगायची जरूर नाहीं तें. केंव्हांच कळलंय मला. आणि क्षमा तर कधींच केलीय मीं.

आणि मीं त्यांना माझ्या बाहुपाशांत घेतलें. त्यांनींही आपली मान अगदीं विश्रब्धपणें माझ्या गळ्यांत घातली. त्यांच्या हृदयाचें स्पंदन हळुहळू कमीकमी होत होतें. मला अशा आलिंगनाचा अनुभव पूर्वी कधींच आला नव्हता.

सलणारें शल्य निघायचें समाधान होतें त्यांत.

—१०—

# निर्मला !—

ठण्, ठण्, ठण्......पांचचे ठोके पडले. लेजर बुक्स् बंद झालीं. जिना धडधडूं लागला. लाडकीनें विणलेली फराळाचा डबा ठेवण्याची पिशवी घेऊन विश्वासरावांनीं घरचा रस्ता सुधारला. टेबल आवरण्याच्या धांदलींत धोंडोपंतांनीं दऊत फोडली. केशवराव चोर पावलांनीं केव्हांच निसटून गेले होते. खिशांतील लक्स सँपल साबणाच्या वडीनें तोंड धुण्याकरितां बन्या भटाच्या खोलींत घुसला. 'प्रीती मिळेल काऽहोऽबाजारीं ! प्रीती मिळेल काऽहोऽशेजारीं' कुठून तरी गाण्याची लकेर आली. जिना उतरतां उतरतां कुणीतरी चंडोलगिरी करीत असावा.

अवघ्या पांच मिनिटांत ती जागा भकास दिसूं लागली. मधूनमधून नाइलाज म्हणून राहिलेले तेवढेच लोक दिसत होते.

निर्मला अजून तिथेंच दिसत होती. मुद्दामच रेंगाळत रेंगाळत टाइपिंग चालविलें होतें तिनें. काल क्रिकेटमॅचमध्यें रवींद्रनाथानें ऑफिसची बाजू ऐनवेळेला सांवरून धरून एक रन्नें विजय मिळवून दिला. त्याबद्दल अभिनंदन करणार होती ती त्याचें आज. त्याच्याबरोबर एकदमच बाहेर पडायचें ठरविलें होतें तिनें. मधूनमधून ती जरी आपल्या जागेवरून इकडे तिकडे नजर टाकीत होती तरी मध्येंच कसल्या तरी विचारांत इतकी गढून गेली कीं तिच्यासमोर रवींद्रनाथनें येऊन 'अजून नाहीं संपलं वाटतं ?' असें म्हटल्यानंतर मात्र ती जरा गोंधळल्यासारखी झाली.

"काम टाकून थोडंच जातां येतं" आलेला हल्ला त्या स्थितींतही तिनें सहज परतविला.

"कुणाचा होऊं नये चाकर आणि कुणाची होऊं नये बायको !"

"बोलायचंच तें ! पाळी मात्र प्रत्येकावर येते." उठतां उठतां ती म्हणाली.

आणि जिना उतरतां उतरतां त्याच्या खेळाची तिनें खूप तारीफ केली. व तिच्या मनांत त्याच्याबद्दल वाटत असलेला आपलेपणा अधिकच दृढ झाला. नेहमींच्या पद्धतीप्रमाणें टेनिस खेळावयास न जातां आज तिनें रवींद्रनाथाबरोबर फिरायलाच जायचें ठरविलें.

कॅफेमधून तीं थेट समुद्रावर गेलीं. किनाऱ्यावरील शीलातलावर लोकांच्या गर्दीपासून जरा दूरच जाऊन तीं बसलीं. या वेळीं जवळ जवळ सात होऊन गेले होते. लोकांची गर्दीही ओसरूं लागली होती. भरतीचा समय असल्यामुळें सागराच्या उंच लाटा गर्दी करीत किनाऱ्यावर येऊन आदळत होत्या आणि त्याचबरोबर तुषारयुक्त शीतल वारा दिवसभर केलेल्या श्रमांचा परिहार करीत होता. त्या अफाट सागरांत मध्येंच कुठें तरी कोळयाच्या होडींतील दिवा लुकलुके. शुभ्र ज्योत्स्नेंत पृथ्वी अगदीं डुंबून गेली होती. त्या निसर्ग रम्य वातावरणांत रवींद्राच्या हृद्‌सिंधूलाही निर्मलेच्या दर्शनानें भरती आली.

बराच वेळ तो स्तब्ध होता. विषयाला सुरवात कशी करावी हेंच समजेना—भावनेचा जोर व हृदयांतील तळमळ सारखी वाढतच होती. निर्मला भारीच बोलकी असल्यामुळें तिला त्या स्तब्धतेची छळणूक होऊं लागली. मधूनमधून त्याला ती कांहींतरी विचारी. पण हुंकारापलीकडे त्याचें उत्तर येईना. तिच्या अवखळ स्वभावानुरूप शेवटीं तिनें " कोणाचं चिंतन चाललं आहे आज बुवा एवढं ! " म्हणून विचारलेंच.

भानावर येऊन ' कुणाचं नाहीं ' असें त्यानें म्हटलें पण—

अखेर निश्चयपूर्ण मुद्रा करून तो म्हणाला, " बरेच दिवस एक गोष्ट विचारीन विचारीन म्हणतों आहें ! "

" हात्तिच्या ! एवढा विचार कसला ! खुशाल विचारा कीं ! "

" प ऽ ऽ ण—पऽ ऽ ण ऽ.....तुम्ही रागावणार तर नाहीं ना ? "

" रागावण्यासारखं एवढं विचारणार तरी काय आतां ? "

" तसंच महत्त्वाचं कांहीं विचारणार आहें म्हणून म्हणतों. "

" गोष्ट कळूं दे तर खरी ! "

" निर्मले, हें असं एकलकोंडं जीवन तूं काय किंवा मी काय किती दिवस म्हणून कंठणार ? बरं, आतां नोकरीसुद्धां कायम झाली आहे. तेव्हां तूं—"

" काय हें ! रवींद्रनाथ काय हें बोलतां तुम्ही ? "

" माझं तुझ्यावर प्रेम नाहीं असं का तुला वाटतं ? "

" प्रेम ! प्रेमाच्या गप्पा कोण मारत नाहीं ? "

" म्हणजे आपलं कुणी तरी हक्काचं व प्रेमाचं माणूस असावं असं नाहीं वाटत तुम्हांला ? "

" असं कधीं झालं आहे ? पण अगदीं वाईट अनुभव आहे माझा. "

" म्हणजे ? "

" सांगावं तितकं थोडंच ! "

" म्हणजे असं झालं तरी काय ? "

" साध्या माणसाचं आयुष्यसुद्धां मोठमोठ्या महात्म्यांच्या चरित्रावर ताण करतं कधीं कधीं. त्यांच्या आयुष्यांतील घटना पाहिल्या म्हणजे कादंबरींतील अद्‌भूत घटनासुद्धां फिक्या पडतात. लोकांचं कशाला हवंय्‌ ? माझंच पाहा कीं—

" घरची मी अगदीं सुखवस्तु होतें. माझे वडील—नाना हे एक उत्तम वकील होते. त्यांनीं आपल्या गांवीं चांगलाच जम बसविला होता. आईवर त्यांची भारी भक्ति ! त्यांची मी एकुलती एक मुलगी. आईची मी अत्यंत लाडकी ! भाडोत्री घरं मनाजोगी मिळत नाहींत म्हणून नानांनीं एक स्वतंत्र बंगलाच बांधला. आधुनिक सुखसोईनीं परिपूर्ण होता तो. त्यांची बैठक नेहमीं माडीवर असे. अशिलांच्या जाण्यायेण्याचा उपद्रव घरच्या मंडळींना नको म्हणून माडीला त्यांनीं परस्पर जिना ठेवला. जेवणखाण, चहा व फक्त महत्त्वाच्या कामाकरितांच ते खालीं येत असत. कामापुढं त्यांना सवडच होत नसे आधीं. एक दिवस त्यांच्याकडे एक विधवाबाई फिर्याद घेऊन आली. इस्टेटीसंबंधीं दावा होता तो.

" नानांची कीर्ति ऐकून ती नानांकडे आली. नानांची तर दिवाणी दावे चालविण्यांत पटाईत म्हणून ख्याती होतीच ! नानांचा विशेष म्हणजे त्यांच्या

डोळ्यावर श्रीमंतीचा कैफ कसा तो नव्हताच मुळीं. नाडलेले, गोरगरीब, विधवा यांचे खटले वेळींप्रसंगीं विनामोबदला ते चालवीत. माणुसकीला मुकलेले वकील नव्हते ते. नानांना आपली सर्व हकिकत तिनें सांगितली. तिचें म्हणणें ऐकून घेतल्यानंतर नानांनीं आपल्याकडून शक्य ती मदत देण्याचं वचन दिलं. तिला पण हायसं वाटलं. फिर्यादीच्या निमित्तानं माईचं (मी तिला नंतर माई म्हणत असे) जाणं येणं आमच्याकडे वाढूं लागलं. मलाही ती यावीशी वाटे. भारीच प्रेमळ होती ती! दर खेपेला मला ती एक चॉकोलेटची वडी देऊन एक पापा घेत असे माझा. सहा महिने, वर्ष, दोन वर्षे झालीं. निकाल कसा तो लागेना. प्रत्येक वेळीं पुढची तारीख लागल्याचं नाना तिला सांगत असत.

"त्या ओळखीचं रूपांतर हलुहळू प्रेमांत झालं. तिच्यावरचं नानांचं प्रेम वाढत होतं तर आई त्यांच्या मनांतून उतरत चालली होती. एक व्यक्ति दोन व्यक्तींवर एकाच वेळीं खरंखुरं प्रेम करूं शकत नाहीं हें खरं!

"मला कांहीं त्या वेळीं फारसं समजत नव्हतं. फार तर आठ वर्षांची असेन मी. त्या वेळीं जगांतील भल्याबुऱ्या गोष्टींचा अनुभव नव्हता मला! खाणं, पिणं, हांसणं, खिदळणं, एवढंच जग होतं माझं! आठ वर्षांच्या मुलीला छक्के पंजे काय माहीत असणार! परंतु एवढं मात्र मी सांगूं शकेन, का माईची व नानांची ओळख झाल्यापासून आईशीं त्यांचे खटके उडूं लागले. दिवसें-दिवस भांडण विकोपास जाऊं लागलं. पुढं पुढं तर मारामारीपर्यंत पाळी येऊं लागली.

"अशांत एका प्रसंगानं तर अधिकच भर टाकली.

"चहा कपांत ओतून आईनं मला वर निरोप सांगायला धाडलं. निरोप सांगायला म्हणून मी वर गेलें तों तिथं काय? नाना माईचा एक हात आपल्या हातांत घेऊन तिच्या गालावर चापट मारीत असल्याचं निसटतं माझ्या दृष्टोत्पत्तीस आलं. त्यांचं व माईचं भांडण झालं म्हणून त्यांनीं तिला मारलं असावं अशी माझी आपली त्या वेळची कल्पना! 'आई बोलावते आहे' म्हणून दहांदां तरी मी त्यांना सांगितलं असेन. परंतु तिच्याशीं भांडण झाल्या-

मुळं रागाच्या सपाट्यांत माझ्याकडे त्यांचं लक्ष कुठं होतं ! झाला प्रकार खालीं जाऊन आईला मीं सांगितला. आईच्या मनांत कसला तरी संशय आला व खरा प्रकार पहायला म्हणून वर गेली. फटींतून डोकावून तिनं पाहिलं मात्र, लगेच डोकीला हात लावून पटकन् ती खालींच बसली. त्याच रात्रीं आईचं व नानांचं खडाजंगी भांडण होऊन त्यांनीं तिला अमानुषपणं मारलं व सांगितलं कीं 'मोठी सोवळी आली आह ! तुला जर हें खपत नसेल तर चालती हो इथनं ! या घराचा मी मालक आहें ! हें घर माझें आहे !'

"आणि खरोखरच मामांना पत्र घालून त्यांच्याबरोबर आमची रवानगी केली. मी जरी लहान होतें तरी मलाही नानांचा खूप राग आला. मामांनीं आईला कायदेशीर पोटगी मिळवून दिली. दुसऱ्यांच्या अन्नवस्त्रावर दावे चालविणाऱ्यानं आपल्या पत्नीवर हा प्रसंग आणावा ना !

"नानांची आठवण झाली म्हणजे मी विचारीत असें–'नाना कधीं येतील ग आई ?' परंतु आई कांहीं न सांगतांच हुंदके देत देत रडे व मग तिच्याकडे पाहून मला जास्त कांहीं विचारण्याचा धीर होत नसे. नानांच्या फोटोकडे पाहून आईला रडतांना कैक वेळां मीं पाहिलें असेन. मला त्या बालवयांत वाटे कीं नानांनीं आईला इतकं मारलं मग तिला त्यांच्याबद्दल इतकं वाईट कां वाटावं ?

"'नवऱ्यानं टाकलेली बायको' म्हणून लोक आईकडे बोटं दाखवीत. या व अशा अनेक गोष्टी पाहून आई मनांत भारी कष्टी होत असे. कितीतरी रात्री तिनें रडून घालविल्या असतील. चार वर्षांत झुरणीस लागून त्यांतच तिचा अंत झाला.

"मला आतां बरंच समजूं लागल्यामुळं तिचा वियोग चांगला जाणवूं लागला. मी त्या वेळीं १२।१३ वर्षांची असल्यामुळं व माझं आजोळ बालबोध वळणाचं असल्यामुळं आईच्या मृत्यूनंतर थोड्याच दिवसांत मामांनीं मला शाळेंतून काढलं. घरची गरिबी होती. मूलबाळ कोणी नव्हतं एवढंच ठीक ! मामा कांहींच उद्योग करीत नसत. पण चहा, विडी, तंबाकू याशिवाय त्यांचं चालत नसे. मामी मात्र कुणाचं दळण कांडण करून आलेले पैसे संसाराला लावीत असत. मीही त्यांना शक्य ती मदत करीत असें. विडी, तंबाकूपायीं होतं

नव्हतं तें किडुकमिडूक विकून पार केलं. हा गृहस्थ कांहीं एक उद्योग न करतां नुसता झोपाळ्यावर बसून चहा पिई नि विड्या ओढी. नोकरीच होऊन बसली होती ती त्यांची एक! वेळेवर वस्तु मिळाली नाहीं किंवा घरांत अमुक जिन्नस नाहीं सबब अमुक पदार्थ तयार करतां येणें शक्य नाहीं अशी तक्रार केली कीं ते तिला मारीत असत. हा गृहस्थ कांहीं एक उद्योग न करतां घरीं बसतो व जेवायला घड मिळत नाहीं म्हणून जिवाआगळ काबाडकष्ट करणाऱ्या बायकोला मारतो याचं मला राहून राहून नवल वाटे. ती बिचारी माऊली होती. ' पदरीं पडलें व पवित्र झालें ' या समजुतीनें दिवस कंठीत असे. माझ्यावर तिची आईप्रमाणं माया होती.

" मी राहिल्यापासून त्यांचं बरं चालू लागलं. नशिबानं आईच्या अन्नवस्त्राचा पैसा अजूनही चालू होता. तिथंच वसंत नांवाचा त्यांचा कोणी लांबचा नातलग जेवायला येत असे. तो कांहीं पैसे देई. अशा स्थितींत त्यांचं कसंतरी चाललं होतं.

" वसंताला माझ्याबद्दल भारी वाईट' वाटे. माझ्याविषयीं त्याला पूर्ण सहानुभूति होती.

" एकाच ठिकाणीं दोघं राहिल्यानं माझा व वसंताचा उत्तरोत्तर चांगलाच परिचय होत गेला. कॉलेजांत होता तो. मामांनीं मला जरी इंग्रजी तिसरींत असतांनाच शाळेंतून काढलं तरी मला वाचनाचा नाद बराच असल्यामुळं तो मला कादंबऱ्या, नाटकं व इतर अन्य पुस्तकं वाचायला आणून देई. कॉलेजांतून आल्यानंतर फिरायला जातांना वाचून झालेल्या भागावर आम्ही वादविवाद करीत असूं. माझ्याकडे लक्ष देण्यास मामांना त्यांच्या आवडत्या व्यवसायामुळं फुरसत मिळत नसे, व मजविषयींच्या आपलेपणामुळं मामींकडूनही मला आडकाठी होत नसे.

" आमच्या परिचयाचं रूपांतर आम्हांला नकळत प्रेमांत होत होतं. पुढें पुढें तर त्याच्याशिवाय मला व माझ्याशिवाय त्याला बिलकूल चैन पडत नसे. शेवटीं तो बी. ए. पास झाल्यावर विवाहबद्ध होण्याचं आम्हीं ठरवलं.

" बी. ए. ची परीक्षा झाल्यानंतर उन्हाळ्याच्या सुटींत तो आपल्या घरीं गेला. तो जाण्यापूर्वीची रात्र अजून मला आठवते. आम्ही आमचीं ध्येयें-तत्त्वें

यांवरील खूपखूप गोष्टी केल्या. त्या चांदण्या रात्रीं वसंताच्या उन्मादक सहवासांत लुटलेला आनंद हाच माझ्या आयुष्यांतील सुखाचा शेवटचा क्षण ठरला. रात्र केव्हां गेली तें कळलंसुद्धां नाहीं. एक दोन महिने एकमेकांपासून दूर रहावं लागणार या विचारानं भारी वाईट वाटलं. मोठ्या कष्टानं परस्परांना निरोप दिला आम्हीं. त्यानें दर दोन दिवसांनीं पत्र लिहिण्याचें कबूल केलं. ठरल्याप्रमाणें एक महिना वेळच्या वेळीं पत्रं आलीं. त्यानंतर मात्र दोन ओळीसुद्धां आल्या नाहींत. माझ्याच्यानें रहावेना. आजारीबिजारी तर पडला नाहीं ना ? अशा अनेक शंकाकुशंका मनांत येऊं लागल्या. महिना पंधरा दिवस लोटल्यावर खरा प्रकार पहाण्यासाठीं मींच स्वतः जाण्याचं ठरविलं. शिवाय मला जायला दुसरंही कारण होतं. जग हंसेल मला ! हृदयविदारक वाक्बाणांचा वर्षाव होईल माझ्यावर. पण मला सांगितल्याशिवाय राहवत नाहीं. प्रकृती ठीक नसे अलीकडे माझी. मला अनुपमेय अशा मातृसुखाचा मोह आवरतां येत नव्हता. नवीन आपत्तीची जाणीव होती मला. दुर्दैवानं मामींच्या लक्षांत ही गोष्ट आल्याशिवाय राहिली नाहीं. मामा-मामींची कुजबुज सुरू झाली. मामांनीं तर रुद्रावतार धारण केला. त्यांचं घर सोडणं भाग होतं मला.

"येऊन जाऊन वसंताचा आधार राहिला. मला त्याच्याकडे जाण्याची उत्कंठा—नव्हे निदान माझा अधःपात टाळण्यासाठीं तरी जाणें भाग होतें. भाड्यालाही पैसे नव्हते. आईनें दिलेली आंगठी विकली. जाणूनच आईशीं प्रतारणा केली. मनाचा हिय्या करून अधीर मनानें गाडींत तर बसलें एकदां. गाडीच्या दुप्पट वेगानें धांवूं लागलं माझं विचारचक्र. केव्हां एकदां त्याला भेटेन नि मग अशी—

"दैवानं माझी पाठ अजून सोडली नव्हती. सारा निराळाच प्रकार वसंताच्या घरीं दिसला. हातांत माळ घेऊन बोहल्यावर उभा होता वसंत. विश्वासच बसेना डोळ्यावर. सुन्न होऊन गेलं डोकं अगदीं. बोट लागलेल्या माणसाप्रमाणं फिरलेल्या दिसूं लागल्या सर्व वस्तु. रागही आला खूप. सर्व अवसान एकवटून बोहल्याचा मार्ग धरला गर्दीतून. मंडपाचे डोळे माझ्याकडे लागले.

" ' वेडी दिसते आहे कुणीतरी !' सर्वजण म्हणूं लागले.

" जास्ती शोभा करून घेण्यांत अर्थ नाहीं हें समजल्यावर स्टेशनचा रस्ता धरला. माझा जीव त्याच्याकरितां तिळ तिळ तुटत होता. पण त्याला काय त्याचं ? लग्नाच्या आणाभाका घेऊन अवघ्या दोनतीन महिन्यांत साधी ओळखसुद्धां न दाखविणाऱ्या माणसाला काय म्हणावं ? पुरुषी प्रेमाच्या पुष्कळ गोष्टी ऐकल्या होत्या अमकीला अमक्यानं फसवलं म्हणून. पाण्याचा घोट न घेतां दुसऱ्याच गाडीनें परतलें.

"आल्या आपत्तीला भाग होतं तोंड देणं. ओळखीच्या चार दोन लोकांच्या मदतीनं शिरकाव करून घेतला अनाथाश्रमांत. मॅट्रिकपर्यंत तिथं शिक्षण झालं माझं. त्यांनींच लावून दिली ही मला नोकरी. अनाथाश्रमांत माझा शिरकाव न होता तर मी कोणत्या गर्तेत जाऊन पडतें न कळे ! आणि आतां ही तुमची ओळख झाली गेल्या सहा महिन्यांपासून.

" पुरुष म्हटला कीं भीति वाटते, एक प्रकारची मला त्यामुळं. पुरुषी प्रेम विस्तवासारखं वाटतं मला. विस्तवाशीं नाहीं का आपण जपून खेळत !

" तुम्हीच सांगा रवींद्रनाथ, कीं पुरुषाबद्दल एक विशिष्ट चीड आली तर दोष कुणाचा ?"

" पण सगळेच तसे थोडे असतात ?"

-११-

# "-दोन डोळे-"

मालती जवळ जवळ धांवतच दाराकडे आली. एखाद्या लहान मुलीप्रमाणें तिच्या त्या धांवण्याचें मला हंसूं आलें. पण ती जवळ आल्यानंतर मात्र तिच्याकडेच सारखें पहावेंसें वाटूं लागलें—

कोरड्या केंसांना तिनें नुसती एक सुरगांठ देऊन ते पाठीवर मोकळे सोडले होते. अंगांत फक्त बॉडी घातली होती. खांद्यावर दोन बोटें रुंदीची पट्टी असल्यामुळें, खांद्यापासून उघडे असलेले तिचे गौर हात, उघड्या गळ्यामुळें दृग्गोचर होणारे तिचें वक्षःस्थळ, धांवत आल्यामुळें सुस्पष्ट दिसणारी उरोजांची खालवर—मी तिच्या त्या मादक सौंदर्याकडे विलोभनीय दृष्टीनें टक लावून पहात होतों.

मालतीच्या तें तेव्हांच लक्षांत आलें. मानेला अनुरागाचा एक हिसडा देत, माझ्यावर मोठाले डोळे करीत ती म्हणाली—"इश्य हें काय."

खांद्यावरून घरंगळून पायापाशीं पडलेला पदर उचलण्याकरितां ती खालीं वांकली.

खुर्चीवर बसतां बसतां मी म्हणालों—"माला, राग आला ना तुला माझा."

माझ्या या प्रश्नानें तिचे डोळे किंचित् ओलावले. एकवार माझ्याकडे पाहून, खुर्चीच्या हातावर आपल्या हाताचें बोट घाशीत ती म्हणाली—"आवडत्या माणसाचा राग नसतो येत कधीं—"

मालतीचें म्हणणें मला स्वतःला तरी काय अनुभवाला आलें नव्हतें—

मी अन् मालती बरोबरच इंटर झालों. ती चांगली 'सेकंडक्लासांत' आली. आनंदाप्रीत्यर्थ म्हणून तिनें एक मेजवानीचा बेत केला. कितीदां तरी तिनें मला बजावून बजावून येण्याविषयीं सांगितलें. अखेर मलाच जरा ओशाळल्यासारखें झालें. मालतीकडे जावयाचें म्हणून मीं आईला सांगूनही ठेवलें—

पण आयत्या वेळीं बाहेरगांवीं जावें लागल्यामुळें मी कांहीं तिच्याकडे जेवावयास जाऊं शकलों नाहीं. मला वाटलें–मालती आतां खूप चिडली असेल, कदाचित् ती आपल्याशीं बोलणारसुद्धां नाहीं. मालती एका श्रीमंत प्रोफेसराची मुलगी अन् मी चाळीस रुपये पगारावर कारकुनी करणाऱ्या गृहस्थाचा शिकवण्या करून शिकणारा गरीब मुलगा. माझ्यासारख्या गरीबाला एवढा मान लागतो याचेंच मालतीला आश्चर्य वाटेल.

परंतु दुसरे दिवशींच मालती माझ्याकडे आली नी म्हणाली—" तापबीप आला होता वाटतं काल. मग कां आलां नाहीं."

मी कांहींच बोलत नाहींसें पाहून तीच पुढें म्हणाली—" बरं. नाहीं आलांत तर नाहीं. पण मी मात्र तुम्ही पास झाल्याबद्दल तुमच्याकडून पेढे घतल्या-शिवाय सोडायची नाहीं."

अंतःकरण गहिंवरून आल्यामुळें मीं तिला म्हटलें—" गरिबाकडे कसले पेढे आले. पण चहा मात्र तयार आहे—"

माझ्या चेहऱ्यावर आपली दृष्टि स्थिर करीत मालती म्हणाली,

—" असं काय वेड्यासारखं बोलायचं—"

त्यावर मी म्हणालों–" मालू, गरिबांचं वेड बरं. पण श्रीमंतांचं पैशाचं वेड, आणि मुलींचं—"

पण मला पुरतें बोलूं न देतां मालती मध्येंच म्हणाली–" बरं. बरं. पुरे हं आतां—"

जुनी आठवण होऊं नये म्हणून मीं मालतीकडे पाहिलं. पण जखमेकडे पाहिलें नाहीं म्हणून जखमेंतील रक्त येण्याचें थोडेंच थांबतें. माझ्यासमोर अशीच एक आठवण उभी राहिली—

आपल्याला देण्याकरितां म्हणून मालतीनें एक 'प्रझेन्ट' आणलें होतें. तिची अतिशय इच्छा कीं आपण तें घ्यावें. पण माला हें विसरत होती कीं आपण एक गरीब अविवाहित तरुण होतों.

किंचित् हंसून तिनें तें 'प्रेझेन्ट' आपणासमोर धरलें. पण तें हातांत न घेतां आपण तिच्याकडे पाहिलें—

मातेनें आपल्या तान्हुल्याला देण्याकरितां त्याच्या पित्याजवळ न्यावें, पण त्या पित्यानें मात्र त्याला घेण्याकरितां हातसुद्धां पुढें करूं नयेत म्हणजे त्या मातेची मुद्रा जशी होते—

मालतीचाही चेहरा मला थोडाफार तस्साच झाल्यासारखा वाटला.

इतकें असूनही मालती माझ्यावर कधींच रागावली नाहीं. माझ्या मनांत आलें—तरुणाच्या प्रेमाला सरळव्याजाची उपमा दिली तर तरुणीच्या प्रेमाला चक्रवाढव्याजाचच्चि उपमा द्यावी लागेल.

मीं मालतीकडे पाहिलें. केसावरून ती हळूहळू—कंगवा फिरवीत होती. तिच्या हातांतील कंगवा घेत मीं विचारलें—" माला, तूं म्हणतेस तें खरं आहे का ग ? "

माझ्याकडे किंचित् रागानें पहात तिनें मानेला एक वळसा दिला. स्त्रीच्या मूक अभिनयांत कित्येक वेळां जास्त अर्थ अभिप्रेत होतो. मालाच्या त्या किलकिल्या डोळ्यांच्या नजरेंतला अर्थ समजण्यास मला फारसा वेळ लागला नाहीं.

माझ्या मनांत आलें—स्त्रीला आवडत्या माणसाचा राग नसतो येत, पण मी जें हिला आतां सांगेन तें ऐकून हिला रागच काय पण—

माझ्या मनांत चाललेली खळबळ माझ्या चेहऱ्यावर दिसूं लागल्यामुळेंच कीं काय, मालती माझ्या अगदीं जवळ आली.

माझ्या खांद्यावर हात ठेवीत म्हणाली—" श्री, काय झालं रे तुला असं विचित्र तऱ्हेनें वागायला."

तिचा हात हातांत धरून मी म्हणालों—" माला, माणसाची इच्छा कधींच पूर्ण होऊं नये असंच का दैवाला वाटत असतं—"

नकळत माझ्या डोळ्यांत अश्रू तरारले. मालतीला माझ्या या वागण्याचा कांहींच अर्थबोध झाला नाहीं.

" श्री, असं काय वेड्यासारखं करतोस. मला नाहीं का सांगायचं काय झालं तें—" माझ्या चेहऱ्यावर आपली दृष्टि स्थिर करीत मालती म्हणाली.

मीं मालतीच्या उघड्या गळ्याकडे पाहिलें. तिनें गळ्यांत टपोऱ्या मोत्यांचें

एक पेंडकें घातलें होतें. त्यांत असलेला हिरव्या रंगाचा हिरा मध्येंच चमकला. पण क्षणैकच—

माझ्या मनांत त्याच क्षणीं एक विचार आला—गरिबांच्या मनांत अशीच इच्छा चमकते. पण—

विद्युल्लतेची चमक क्षणैक प्रकाशमान वाटते, पण तिच्या योगानें अंधाराची भीषणताच जास्त दुणावत नाहीं का.

कित्येक गोष्टी तोंडानें उघड उघड बोलून दाखविण्यापेक्षां त्या कागदावर लिहून सांगतां येतात. माझेंही तस्सेंच झालें. जी गोष्ट मी मालतीला तोंडावर सांगूं शकलों नाहीं तीच गोष्ट तिला लिहून कळवावी म्हणून मी लिहावयास बसलों—

" मालती—

" माणसाचें लग्न त्याच्या मनाप्रमाणें होऊं नये असंच दैवाला वाटतं कीं काय न कळे. तुझी आणि माझी कॉलेजपासून ओळख, नव्हे, मैत्री झाली. कुठलीही गोष्ट मी तुझ्यापासून लपवून ठेवली नाहीं अगर तूं सुद्धां एखादी गोष्ट मला सांगितली नाहींस असं झालं नाहीं. आपण बी. ए. त होतों त्या वेळीं तूं म्हणाली होतीस—' श्री आपण जन्मभर अशीं एकत्रच राहूं पण हें कसं शक्य आहे रे'—माला, तो प्रश्न विचारतांना तूं अगदीं एखाद्या लहान मुलासारखा केलेला अभिनय, त्या वेळीं तुझ्या मानेची झालेली हालचाल अन् त्या हालचाली-बरोबर तुझ्या कानांतील हिऱ्याच्या डुलांची हालचाल—अजूनही मला तें सारं आठवतं.

तुझ्या प्रश्नाचें मी उत्तर दिलें होतें—'आपण लग्न करूं म्हणजे मग आपल्याला एकत्र राहतां येईल !'

तुझ्या प्रश्नाचें उत्तर तूं माझ्याकडून काढून घेतलेंस, पण तेंच उत्तर तुझ्या तोंडांतून प्रश्नाआधी बाहेर पडणार होतें. परंतु तरुणीला आपल्या आवडत्या माणसाकडूनच तें उत्तर अगोदर यावें याची सारखी रुखरुख लागलेली असते हें समजण्यास मला मोठेंसें अवघड होतें अशांतला भाग नाहीं.

माल्ू, तूं एकदां म्हणाली होतीस–' स्त्रीला आवडत्या माणसाचा राग नसतो येत–' खरं आहे ना हें. मग मी अगदीं स्पष्ट लिहितों तुला–आपण लग्न करावयाचं ठरविलं पण तें शक्य नाहीं. हें वाचून तूं मनांत म्हणशील–श्री अखेर पुरुष जातीवर गेलाच. एखाद्या मुलीवर तर श्रीचें प्रेम बसलें नसेलना.

माल्ू, प्रेम म्हणजे काय एखादा सांथीचा रोग आहे, कीं जो चट्‌कन कुणालाही होईल. मनुष्य आयुष्यांत प्रेम फक्त एकदांच करूं शकतो हें कांहीं खोटें नाहीं. बऱ्याच अविवाहित तरुण–तरुणींत उत्कट प्रेम असतें, पण त्यांतील कितीजणांचे विवाह होतात. वेलीला फळें येण्यापूर्वींच फूल सुकून जावें, अशांतलाच प्रकार बऱ्याच जणांच्या बाबतींत होतो. स्त्रीच्या बाबतींत पुरुष तिच्या रूपाला जास्त गुण देतो हें जरी खरें असलें तरी रूपाची उणीव कित्येक वेळां पैशानेंसुद्धां भरून निघते. पण पुरुषाजवळ नुसता पैसाच असून भागत नाहीं. स्त्रीला त्याचें प्रेमळ अंतःकरण हवें असतें. पुरुषांचा वरचढपणा आणि बेपर्वाईची वृत्ति—यामुळेंच कित्येक वेळां स्त्रीच्या मनांत पुरुषाबद्दल अढी निर्माण होते. पुरुषांकडून स्त्री सहानुभूतीच्या शब्दांची अपेक्षा करते. पण स्त्रीच्या सहानुभूतीच्या मानानें पुरुषांची सहानुभूति पासंगाला तरी पुरते का?

माल्ू, ज्या वेळीं तूं माझ्याकडे तुझा एक जन्माचा जोडीदार या दृष्टीनें पहात होतीस, त्यावेळीं माझेंच मला आश्चर्य वाटलें. पण आश्चर्य वाटण्याच्या अगोदर मला स्वतःचाच फार अभिमान वाटला.

तुझ्यासारख्या एका सुंदर, सुशिक्षित अन् श्रीमंत प्रोफेसराच्या मुलीचें माझ्यावर प्रेम. माझ्या जागीं दुसरा कुणीही असता तरी त्याला तसंच वाटलं असतं.

तुला वाटेल—रूप, विद्या आणि पैसा या गोष्टी आपल्याजवळ असूनसुद्धां श्री असं कसं लिहितो. तुझ्याजवळ या तीन गोष्टी तर आहेतच, पण आणखी एक गोष्ट तुझ्याजवळ आहे ती—' अंतःकरणाचा प्रेमळपणा. '

माल्ू, कावळ्यानें कोकिळेची अंडीं उबवलीं म्हणून कावळा कधीं कोकिळा झाला आहे का?

सावत्र आईच्या बाबतींत तरी तोच अनुभव येत नाहीं का?

माझें शिक्षण मींच करावें म्हणून आईचा माझ्या मागें बाबांना सल्ला. बाबा तरी काय—

मनुष्य तारुण्यांत असला म्हणजे त्याचें प्रेम मुलापेक्षां पत्नीवरच जास्त असतें. त्यांतून आई ही बिजवराची बायको, यांतच काय तें समज. बाबांचा पगारच काय पण बाबासुद्धां आईच्या अगदीं मुठींत होते. बाबांना तरी दोष देण्यांत काय अर्थ आहे म्हणा—

महिन्याकांठीं चाळीस रुपये पगारावर काम करणारे ते एक कारकून, घरांत पांचसात माणसें आणि शहरची वस्ती—

पण मला शिकविण्या मिळाल्या, पैशांची अडचण मीं भागवली, पण पैसा आला म्हणजे माणूस सुखी होतो असं थोडंच आहे.

कॉलेजच्या नाटकांत उत्तम काम केलें म्हणून मला बक्षिसें मिळालीं, लेखक म्हणून माझा गौरव झाला, मी एक उत्कृष्ट डिबेटरही ठरलों, क्रिकेटमध्यें जास्त धांवा काढाव्या मींच, कॉलेज ऑर्केस्ट्रांत दिलरुब्यावर गज फिरवावा मींच—

सहानुभूति तर राहूंच द्या पण शाब्दिक टोलेच मला ऐकावे लागले.

तशांत तुझी ओळख झाली. अन् दिवसेंदिवस तूं मला हवी हवीशी वाटूं लागलीस.

कॉलेजचे सुखाचे दिवस निघून गेले आणि व्यवहाराच्या कॉलेजांत जागा मिळावी म्हणून मी खटपट करूं लागलों.

वाळयाच्या ताटींत बसलेला मनुष्य एकदम उन्हांत आला म्हणजे त्याची जी स्थिति होते तशीच कॉलेजांतून बाहेर पडल्यावर माझी स्थिति झाली.

बी. ए.ची पदवी घेतलेला मी एका गरीब कारकुनाचा मुलगा, नोकरीशिवाय दुसरें काय करूं शकणार? पण नोकरी मिळवावयाची म्हणजे मंडईतून भाजी आणण्याइतकें सोपें का आहे!

घरांत वडील थकलेले, दोन लग्नाच्या बहिणी, भावांच्या विद्या अर्धवट झालेल्या,—अशा परिस्थितींत जी मिळाली ती नोकरी करणें मला भाग होतें. परंतु माझ्यापाशीं वशिला नव्हता. माझ्याच बरोबर पास झालेलीं मुलें मोठमोठ्या हुद्यावर चढलीं.

त्यांच्याकडे पाहिलं म्हणजे वाटे–मला साधी कारकुनीसुद्धां मिळूं नये ना. माळू, मनुष्यांत गुण असला, विद्वत्ता असली आणि त्याचं जर योग्य चीज झालं नाहीं तर त्याची स्थिति पिंजऱ्यांतल्या सिंहाप्रमाणें होते.

परिस्थितीमुळें मला खाजगी संस्थेंत पंचवीस रुपयांची नोकरी करावी लागली.

पुढें मागें आपली बढती होईल असें मला वाटलें, पण माणसांच्या डॉक्टराला गुरांच्या डॉक्टराच्या जागीं नेमण्यांतलाच तो प्रकार झाला.

महिना पंचवीस रुपये मिळविणारा मी–अशा परिस्थितींत मी लग्न कसें करणार. जिथें आईच्या हौसेखातर म्हणून मला तिच्याकरितां एक जरीचं लुगडंसुद्धां घेतां येऊं नये, भावाबहिणींची हौस म्हणून त्यांना एखादा सिनेमा-सुद्धां दाखवितां येऊं नये, बाबांचें ऑफिस दूर म्हणून त्यांना टांग्यांत पाठवावें असें फार वाटतें पण महिन्याकांठीं टांगेवाल्याचे पैसे द्यावयाचे तरी कुठून ?

माळू, कॉलेजांतून तुझीं पुस्तकें आणण्याकरितां जिथें तुझा नोकर येत होता, स्वतःच्या लुगड्याचासुद्धां जिथें तूं कधीं पिळा केला नाहींस, तुझा हात आणि केरसुणी यांच्यांत जिथें दोन ध्रुवांचें अंतर होतें—

कदाचित् तूं आल्या परिस्थितीला तोंड देशील पण—

माला, हरभरा खायला जरी गोड वाटला तरी पण पचायला तो फार कठीण असतो.

मनुष्य पैशापुढें, आईबापापुढें, समाजापुढें, वेळ पडली तर देवापुढेंसुद्धां वांकणार नाहीं—

पण मनुष्य परिस्थितीचा गुलाम व्हावयास कांहींच वेळ लागत नाहीं.

मी तुला फसवित नाहीं अगर माझें दुसऱ्या एखाद्या मुलीवर प्रेमही पण नाहीं.

परंतु तुझ्या आणि माझ्यामध्यें परिस्थितीची भरभक्कम भिंत आडवी उभी आहे. आपण एका हांकेवर आहोंत हें खरें, पण दोन डोळे जवळ असले तरी त्यांची कधींतरी भेट झाली आहे का. असें आहे तरी ते आपलें कर्तव्य कधीं तरी सोडतात का, तसेंच तूं देखील–जास्त तरी काय लिहूं मी—

तुझाच

श्री—

## –१२–

# तिची मुलगी

( जिवंत अगर मृत व्यक्तीस उद्देशून नसलेली कथा )

" मालन, हा आत्मघातकी विचार शिकवला तरी कुणी ! " त्यानं अत्यंत चिडून विचारलं.

" स...मा...जा...नं..." प्रत्येक अक्षरावर सारखाच जोर देत मालन तितक्याच संथपणानं म्हणाली.

एकच क्षण तिच्या डोळ्यांत एक मिस्किलपणाची लकेर चमकून गेली.

" स्वधर्मे निधनं श्रेयः ! अरे बाबा ज्यांनीं त्यांनीं आपला धर्म पाळावा असं गीतेचं वचन आहे " तिनं हंसतच त्याच्याकडे पाहिलं.

अनंग मात्र रागानें तांबडा लाल झाला.

" मालन, फसवलंस मला तूं...! मालन, काय केलं नाहीं मीं तुझ्याकरतां ! स्वतःचा धर्म, समाज, नातेवाईक या सर्वांचा मीं त्याग केला. तुझ्याकरतां वाटेल तसले अपमान सोसले. प्रत्यक्ष आईबापाची पर्वा केली नाहीं, अन् तूं... तूं मात्र फसवलंस मला...!"

" वेड्या मी तुला फसवणार होतें. पण आज माझं तुझ्यावर खरं खरं प्रेम आहे रे ! आठ दिवसांपूर्वी तुझ्यावर माझं थोडं देखील प्रेम नव्हतं. पण माझ्या सौंदर्यानं अन् बाह्य हावभावानं तुला आपला गुलाम करून ठेवला होता. त्यावेळीं माझ्या एका कटाक्षानें वाटेल तसा तुला नाचतांना पाहून मनांतल्या मनांत हसूं येत असे मला. माझ्या संगतींत कांहीं क्षण घालवायला मिळावेत म्हणून जेव्हां तूं अत्यंत प्रिय वस्तूचा देखील त्याग करीत होतास तेव्हां तुझ्या त्या वेड्या कृत्याकडे पाहून हंसावं का रडावं हेंच समजेनासं होई. पण या आठ दिवसांत चमत्कारिक घटना घडून आली. तुझ्याविषयीं मला खरोखरीच प्रेम वाटूं लागलं अन् मी खरी गोष्ट तुला सांगितली. जेव्हां मी तुला फसवीत

होतें तेव्हां तूं माझ्याकरतां वाटेल तें करायला तयार होतास अन् आज मी तुझ्यावर खरं प्रेम करीत असतांना मात्र मी तुला फसवलं असं म्हणावंस...!"

"बस्स् कर मालन, मीच मूर्ख हें सिद्ध करायला तूं नकोस. सर्वस्वाचा त्याग करून तुझ्यासारख्या वेश्येच्या पोरीमागें.........!"

"खबरदार अनंग. उद्यां कदाचित् मी वेश्याही होईन. पण वेश्येची मुलगी खास नाहीं मी. माझी आई आज वेश्या आहे ही गोष्ट जरी खरी, तरीपण मी पांच वर्षांची झाल्यावर मगच आईनं वेश्याव्यवसाय सुरू केला......! केला कसला समाजानं करायला भाग पाडलं. वेश्याव्यवसाय सुरू करण्यापूर्वी मला कोणीतरी ठेवून घेऊन संभाळ करावा म्हणून तिनें सारखे प्रयत्न केले. तुम्ही लोक दगडाच्या देवाकरितां मंदिरं बांधाल, अन्नाचे पर्वत नासवाल पण जिवंत जिवाची गर्तेतून सुटका का करणार आहांत...? अन् असे सुटका करणारे असतां तर आज माझी आई......जाऊं दे अनंग. मला एव्हढंच सांगायचं आहे. "आईचा विवाह अगदीं देवब्राह्मणासमोर झालेला होता माझ्या वडिलांशीं, म्हणून माझा जन्म तुझ्या जन्माइतकाच पवित्र आहे......"

"क्षमा कर मालन. रागाच्या भरांत मी तुझ्या मनाला लागण्यासारखं बोललों. पण खरंच का तूं देखील वेश्याव्यवसाय सुरू करणार? छेः! शक्यच नाहीं वाटत मला. नुसतं वेश्येची मुलगी म्हटलं तर तुला राग आला, ती तूं वेश्येचा धंदा काय करणार! मालन, मालन, नाहीं म्हण ना ग...!"

भावनेच्या भरांत तिचा कोमल हात घट्ट धरून तिच्याकडे पहात होता तो करुण नजरेनं.

"वेडा आहेस झालं. मला अगर आईला वेश्या म्हटल्याचा का राग येणार आहे? वेश्येची मुलगी म्हणतांना तूं जो मातृत्वाचा अपमान केलास त्याचा राग आला मला. ज्या मातृत्वाबद्दल समाजानं तुझ्या आईला ऋणी राहिलं पाहिजे, त्याच दिव्य मातृत्वाबद्दल माझ्या आईला नको का रहायला?...पण कोठपर्यंत जाणार आपण..."

"मालन मला वायफळ गोष्टी नकोत, एकच वचन पाहिजे आहे मला— अन् तें आतांच...तूं वेडेपणाचा विचार सोडला पाहिजेस."

# रत्न १२ वें

" शक्य नाहीं तें अनंग ! "

अनंगनें उद्वेगानें इकडे तिकडे पाहिलें.

चिर परिचयाची जागा. मालन अन् तो याच ठिकाणीं नेहमीं येऊन बसत. नेहमींचें रम्य वाटणारें तें ठिकाण आजच एकाएकीं चमत्कारिक वाटूं लागलें होतें त्याला. संगमावर जायचें एवढ्या कल्पनेनेंच बहरणाऱ्या त्याच्या मनाला आज त्याच संगमाचा तिटकारा वाटूं लागला होता.

डावीकडे नजरहि ठरूं शकणार नाहीं अशी वेगवती गंगा तर दुसरीकडे अगदीं संथपणानं वाहणारी यमुना...

सहजच मालनकडे नजर गेली त्याची. अगदीं शांतपणानं बसली होती ती.

शेजारून वाहणाऱ्या नद्या. पण किती फरक होता त्यांच्यामध्यें.

शेजारीं बसलेल्या मालनच्या अन् त्याच्या विचारांत तसलाच फरक नव्हता का...

ज्या प्रांतांतून प्रवास करतांना त्याच्या विचारगंगेचा वेग आवांक्याबाहेर गेला होता त्याचवेळीं त्याच प्रदेशांतून वहाणारी मालनची विचार–यमुना अगदीं स्थिर...

अन् मालनचे विचार यमुनेशीं तुलना करण्याइतके काळेकुट्ट खास आहेत अन् त्याचे......

नकळत त्याची नजर यमुनेवर खिळली.

" अनंग, यमुनेच्या काळेपणांतली जादू पहातो आहेस होय ! "

" छे. तुझ्या अंतरंगाकडे इतका वेळ दृष्टि असल्यानें आज यमुना खूपच गोरी दिसते आहे मला " उपरोधिक स्वरांत उत्तर दिलें त्यानें.

बराच वेळ बोललें नाहीं कोणीच.

" अनंग आज—आतां माझ्या खोलीवर चल. "

एकदम चमकला तो. मालन...त्याची पूर्वीची मालन त्याला समोर दिसत नव्हती तर एक नवोदित—नवोढा वेश्या त्याच्या समोर होती. अन् ती त्याला खोलीवर बोलावीत होती...

कसला तरी निश्चय केला त्यानें.

" ह्या नूतन वेश्येबरोबर पहिली रात्र घालविण्याचा मान मिळाल्याबद्दल काय द्यावं लागेल तिला ? "

" मालनला विसरण्याचं वचन ! "

*　　　*　　　*

तीच खोली. याच खोलींत मालन अन् तो पूर्वी किती तरी वेळां गप्पा छाटीत बसत असत.

खोलीच्या खिडकीवरचे निळे पडदे, मालनचा लाडका दिलरुबा, मेज नि त्यावरचीं तीं इंटर मिजिएटचीं पुस्तकें ! सर्व कांहीं जेथल्या तेथें होतें......

मग...मग आजच त्याला असें दबकल्यासारखं कां होत होतं !

पहिल्यानं त्याची अन् मालनची ओळख कॉलेजमध्येंच झाली. नाहीं तरी मालन ही अलाहाबादच्या विश्वविद्यालयांतील एक चर्चेचा विषय होतीच. बनारसच्या एका सुप्रसिद्ध वेश्येची मुलगी ! कां बरं मग होणार नाहीं ती चर्चेचा विपय !!

कधींमधीं तर असेंही सांगण्यांत येई कीं तिच्याशीं लग्न करणाराला तिची आई स्वतःची लाखों रुपयांची संपत्ति देणार आहे. खरें होतें कीं नाहीं कोणाला ठाऊक. पण अनंगची अन् मालनची वाढती ओळख पाहून सहाध्यायीही त्याला " शेट " असें कोणत्यातरी अर्थानें म्हणत. असल्या गोष्टींकडे त्यानें कधींच लक्ष दिलें नव्हतें ही गोष्ट वेगळी.

या विचारानें झालेल्या विमनस्क स्थितींतच त्यानें आजूबाजूला पाहिलें. खोलींतली प्रत्येक गोष्ट-प्रत्येक वस्तू-उद्यांपासून नवीनच कार्यक्रम सुरू करणार...

समोरचा दिलरुबा ! आजपर्यंत अनेकांचें भान हरण करून सात्विक आनंदानें डोलायला लावीत असे तोच उद्यांपासून जमलेल्या चार अचकट विचकट गिऱ्हाइकांचें मनोरंजन करण्या करतांच वाजेल...अन् तो आरसा......

त्याचें विचारचक्र कितीवेळ चाललें असतें कोणाला माहीत, पण संगमावरून परत येतांच कपडे बदलण्याकरतां आंत गेलेली मालन बाहेर आली.

# रत्न १२ वें

अनंग तिच्याकडे पहातच राहिला. मघांच्या अन् आतांच्या तिच्या पोशाखांतील भिन्नता मनाचा ठावच घेणारी होती.

प्रियकराच्या भेटीसाठीं जाणाऱ्या उत्सुक प्रेयसीचा मघांचा नखरेल पोशाख तर प्रेमाची इतर बंधनें तोडून सती जाण्यास तयार झालेल्या स्त्रियांचा पांढरा शुभ्र पोशाख आतांचा. अस्मानी पातळाशीं रंग–संगति करणारी रिबीन सोडून टाकल्यामुळें मोकळी सुटलेली वेणी...

अनंगाला सहन होईना तें दृश्य. तो कसा तरी एकदांचा आरामखुर्चींत बसला.

नेहमींचा सराव असल्यासारखी मालन त्याच खुर्चीच्या हातांवर बसली.

त्यानें अस्वस्थपणानें इकडे तिकडे पाहिलें. त्याच्या त्या अस्वस्थपणाकडे पाहून गोड हंसली ती, अन् जवळची खुर्ची ओढून त्यावर बसली.

" वाटलंच होतं मला कीं माझं इतकं जवळ बसणं तुला आज आवडणार नाहीं. "

अनंग कांहींच बोलला नाहीं.

" वेश्याव्यवसाय इतका का वाईट असतोरे "

" ज्याला त्याला आपला धंदा चांगलाच वाटतो. "

" बरं ! वाईट तर वाईट. पण कां रे अनंग वेश्याव्यवसाय पुरुष कां रे बंद करीत नाहींत ? "

ती काय म्हणते आहे तें नीट न समजल्यामुळें अनंग तिच्या तोंडाकडे पाहूं लागला.

" चोरी करणं, खून करणं वगैरे गुन्हे एक व्यक्ति करूं शकते तसं कांहीं वेश्याव्यवसायाचं नाहीं. तुम्ही पुरुष जर वेश्येकडं जाणं बंद कराल तर वेश्याव्यवसाय बंद–एका क्षणांत नाहीं कां बंद होणार ! हो, पुरुष जर मिळालेच नाहींत तर ती वेश्या एकटी का धंदा करूं शकणार आहे ?...अन् गंमत अशी कीं ती मात्र पतिता ठरते समाजांत अन् पुरुष......

" जाऊं दे, अनंग आतां तुला एका कामाकरितां आणलंय् येथें......"

गोंधळून थांबली ती थोडी. कोणत्या तरी गोष्टीची साखळी जुळवीत असावी.

" अनंग, आज तुला मी तुझ्या मालनचा–होय, अखेर तुझीच रहाणार—अन् तिच्या आईचा इतिहास सांगणार आहे. "

तिनं टेबल–स्टॅन्डचं बटन दाबतांच टेबलावरचा झगझगीत दिवा विझला व मागच्या बाजूला भिंतीवर असलेल्या दहा कॅन्डल–पावरच्या दिव्याचा मंद हिरवा प्रकाश खोलींत पसरला.

* * * *

" अनंग, लहानपणीं आई माझ्यापेक्षां कांकणभर जास्तच सुरेख होती. कमळं चिखलांतच उगवतात. घरच्या अत्यंत गरिबींतही आईवडिलांच्या प्रेमामुळें पहिलीं तेरा वर्षं आईच्या आयुष्याचीं फारच उत्तम गेलीं. नंतर बदलला काळ.

" आजोबा आजीबाईंना वाटे 'काय कमी आहे पोरींत ! रूप, गुण, सर्व आहे. कोणी राजाचा मुलगा—देखील उचलून नेईल. " स्वप्न, मग तें जागे-पणाचं असो, झोंपेंतलं असो–स्वप्नच ठरायचं. आणखी तीन वर्षं गेलीं. आईला सोळावं लागलं. अन् राजपुत्राऐवजीं मजूर पुत्राला माळ घालावी लागली तिला. रूपगुणापेक्षां पैशाला अधिक मानणाऱ्या समाजाचा कंटाळा येऊनच कीं काय आजोबा आजी त्याचा त्याग कायमचा करून गेलीं.

" नव्या संसाराच्या नवलाईत चार वर्षे केव्हांच निघून गेलीं. मी दोन वर्षांची झालें, अन् त्याच सुमाराला अतिशय कामामुळें हृदयाच्या विकारानं माझे वडील आजारी पडले. घरांत येणारा थोडासाच कां होईना पण तोही पैसा बंद झाला. आईनं पुष्कळच धडपड केली पण संसाराला अन् औषधाला पुरेल इतका पैसा मिळेना. गरिबाला मित्र असणार तरी कोण अन् असले तरी त्याच्यासारखे कफल्लकच असणार ते.

" औषधाच्या अभावाला बाबांचा बळी पडला. बाबांना उचलतांना म्हणे आईच्या डोळ्याला टिपूसही नव्हतं. कसं असणार ? औषधावांचून—पैशावांचून त्यांची होणारी हाल अपेष्टा किती भयंकर होती " तें पाहिलं असेल त्याला त्यांची त्या नरकांतून सुटका झाली हेंच बरं झालं असं वाटूं लागलं असतं.

" आई अन् मी समाजाच्या दृष्टीनें अनाथ झालों. घरांत पैसा नव्हताच तेव्हां दहा दिवसांच्या आंतच आईला कामासाठीं बाहेर पडावं लागलं. लोक म्हणूं लागले ' पहा अवदसा नवऱ्याला मरून दहा दिवस झाले नाहींत तोंच गांवांत हिंडते आहे. ' सामाजिक नियमाची जर एवढी काळजी होती तर एका-ग्यानं यायचं होतं कीं पुढं मदतीला. पण छे...

" जोंपर्यंत बिछान्याला खिळलेले कां होईना पण बाबा होते, तोंपर्यंत आईच्या शीलाला रक्षण होतें. पण विधवा...समाजाला Public property वाटते. अन् कोठें प्रश्न निघालाच तर " अरे, नवऱ्याला मरून दहा दिवस झाले नाहींत तोंच बाहेर हिंडणाऱ्या * * ला कसलं आलं आहे शील अन् बील ! " ठरलेलं उत्तर.

" लहान गांव. आधींच कामं मिळण्यासारखीं ठिकाणं फारच थोडीं. अन् शीलाच्या संरक्षणाकरतां सुटलीं कांहीं. काम मिळणं कठीण झालं. भिकेचा धंदा सुरू करावा लागणारसं वाटूं लागलं. पण समाजांत भीक मिळणं कांहीं सोपं नसतं.

" एकदां एका बाईकडे आईनं कांहींतरी मागितलं. बाई म्हणतात, ' चांगली धट्टीकट्टी आहेस ना ग तूं ! मग चार कामं करून पैसा मिळव कीं ! '

' मला तरी काम पाहिजे आहेच. आई द्या ना तुमच्या येथं असलं तर कांहीं ! ' आई म्हणाली.

' तुझ्याइतकी सुरेख मोलकरीण ठेवून माझा ग कसा निभाव लागणार ! '

आई थांबलीच नाहीं पुढचं ऐकायला. " **धट्टीकट्टी म्हणून भीक नाहीं अन् सुंदर म्हणून काम नाहीं.** "

" आईनं बनारसचा मार्ग धरला सगळयांत जवळचं शहर म्हणून. तेथें भीक मिळणं सोपं असतं म्हणून आमचे दोन तीन दिवस बरे गेले. पण शीऽऽल...

" बनारसला भाजीमार्केटमध्यें टोपलीवाल्यांचा धंदा बरा चालतो असं पाहून आईनं तो सुरू केला. कोणी भाजी घ्यायला आलं कीं त्याच्याबरोबर जायचं, त्यानं घेतलेली भाजी टोपलींत भरायची अन् घरीं पोंचवायची.

" ह्याच धंदा करीत असतांना आईला समाजाची खरी खरी पारख झाली.

" आई नवीन असून देखील तिचा जम एकदम बसला. कांहीं घ्यायला येणारे तर तिच्याच करतां थांबत असत जणूं काय ! अन् मजुरी–ती देखील अगदीं भरपूर मिळे.

" आईला वाटलं विश्वेश्वरानं कृपा केली.

" इतर टोपलीवाल्या बायका मात्र कुजबुजूं लागल्या.

" थोड्या दिवसांतच आईला कळून आलं कीं ही कृपा विश्वनाथाची नसून तिच्या सौंदर्याची आहे. मग मात्र आईला त्या धंद्याची एक प्रकारची भीति वाटूं लागली. धंदा सोडायचा तर दुसरं करायचं तरी काय ? सौंदर्याला स्वर्गीय म्हणतात ना ! तेंच तर जिथें तिथें नाश करायला टपलं होतं...

" ती सावधपणानं परिस्थितीचं निरीक्षण करूं लागली.

मार्केटांत शिरतांच उजव्या बाजूला एक दुकान होतें. त्या बाईच्या दुकानावर सारखी गर्दी असे. माल पहाल तर तो थोडासा वाईटच तर कित्येक वेळां शिळादेखिल असे. पण गर्दी मात्र भरपूर. कित्येक, तर वस्तूंचे नुसते भावच विचारून पुढें जात व एकमेकांकडे पाहून डोळे मोडीत. तिच्या दुकानावरची विक्री मालामुळें नव्हती तर **सौंदर्यामुळें** होती.

" आतां आईची खात्रीच झाली. आपला जम बसायला कारण आपलं सौंदर्य आहे तेंच आपला घातही करील एकादे वेळीं."

" ती फारच संभाळून वागूं लागली. तिच्या लक्षांत आलं कीं भाजी देतांना तिच्या बोटांना स्पर्श करण्याचा प्रयत्न मुद्दाम करण्यांत येतो. धंदा बदलणं सोपं का होतं ! तिनं बरेच वेळां गिऱ्हाइकंसुद्धां बुडविलीं थोडंसं विचित्र दिसतांच.

" समाजांत ज्याच्यावर विश्वास ठेवावा तोच आपला घात करतो. नेहमींचा अनुभव हा ! तोच आईलाही आला. वरून धुवटसोळ्या दिसणाऱ्या एका पंड्यानं तिला " **पतिताचं पावन केलं**..."

मालनचा कंठ दाटला होता. तिनं अनंगकडे पाहिलं. कोणत्याच प्रकारच्या भावनेची छटा त्याच्या चेहऱ्यावर दिसत नव्हती. थोड्याच वेळांत मालन शांत झाली.

# रत्न १२ वें

जिवापाड जपलेलं शील गेलं. पहिल्यानं आईला खूपच वाईट वाटलं. पण लौकरच दुःखाची जागा रागानें भरून निघाली.

" समाजावर सूड उगवायचं ठरवलं तिनं. ज्या पंडे महाराजांनीं तिला पतिताचं पावन केलं होतं त्यांच्याच मदतीनं वेश्याव्यवसायांत पाऊल टाकलं; क्षेत्रामध्यें येणारे त्याचे यजमान चांगलेच श्रीमंत असल्यानें, आईला पैसा मिळूं लागला. त्याचबरोबर दोन वर्षांत आईनं गाणं अन् रंगकला–Face colouring–यांतही खूपच प्रगति केली. अन् त्याबरोबरच सूडाच्या प्रतिज्ञे-चीही रोज उजळणी करण्याचा नियम कसोशीनं पाळला.

" आईच्या सौंदर्याची अन् गाण्याची कीर्ति बनारसमध्येंच नव्हे तर बाहेरही पसरूं लागली.

" पैसा आणि सौंदर्य यांच्या जोरावर पोलिस खातेंसुद्धां हळुहळू तिच्या ताब्यांत आलें. तिनं सूडाचा पहिला भाग पार पाडला !

" ज्या पंडे महाराजांनीं तिला 'पावन' केली होती त्याला मैफलीच्या निमित्तानं बोलावून त्याचा सरळ सुऱ्याला बळी दिला.

अनंग एकदम विजेचा धक्का बसल्याप्रमाणें ताठ उठून बसला. मालनच्या चेहऱ्यावर मात्र समाधानाची छटा पसरली.

" पोलीस तर आईच्या ताटाखालचीं मांजरं. दुसऱ्या दिवशीं खुनाची बातमी पसरली. पोलीसांनीं 'डाळमंडींत काल झालेल्या मारामारींतील खून. खुनी इसमाचा पत्ता नाहीं' असा रिपोर्ट दिला. आईच्या प्रतिज्ञेचा पूर्वार्ध निर्विघ्नपणं पार पडला. यावेळीं मी सात वर्षांची असेन.

" आईनं त्यानंतर डाळमंडी सोडून चित्रा सिनेमा थिएटरसमोर राज-रस्त्यावर एक घर विकत घेतलं.

" सौंदर्य अन् गायनांतील अपूर्व तयारी यांच्या जोरावर समाजांतील अनेक कुटुंबांना धुळीला मिळविण्याचा उद्योग चालू केला.

" समाजावरचा सूड होता तो......"

" समाजावरचा ! काय केलं होतं समाजानं !" अनंगनें चिडून विचारलं !

“ काय करायचं बाकी ठेवलं होतं. रूपगुणाला मान न देतां पैशाला मान दिला. पैशाला जर असा भलताच मान समाजानं दिला नसता तर आईचं लग्न गरिबाशीं झालं नसतं, बाबांना औषधावांचून मरावं लागलं नसतं, आईला बनारसला यावं लागलं नसतं......

“ तिच्या पतीचा, तिच्या समाजांतील स्थानाचा, तिच्या सौख्याचा बळी घेऊन समाज थांबला नाहीं तर...तर तिच्या शीलाचाही बळी घेतला त्यानं.”

**“ ज्या सौंदर्याला पैशापेक्षां समाजानं कमी ठरवलं होतं त्याचा उघड बाजार मांडतांच तें विकत घेण्याच्या शर्यतींत त्याच समाजांतील घटक अतोनात पैसा खर्च करूं लागले. त्यांना समाजानं एका शद्बानं विचारलं नाहीं का आडकाठी केली नाहीं.**

“ आणि मनू पालटला.”

“ जिला एका काळीं समाजानं खायलाहि द्यायचं नाकारलं होतं तिच्याच दाराशीं त्याच समाजांतील लक्षाधिपति हात जोडून उभे राहूं लागले. ज्या समाजांतील लोकांनीं पतिता नसतांना तिचा अपमान केला होता, त्याच समाजाच्या सभ्य (!) घटकांत तिच्या पायांशीं लोळण घेणं हाच मान समजला गेला. ज्या समाजानं विधवा म्हणून तिचं दर्शन अशुभ मानलं होतं त्यांतलेच कित्येक पवित्र (!) यात्रेकरू तिचं दर्शन तरी घडावं म्हणून तळमळूं लागले. कित्येक मंदिरांतील पवित्र समारंभ तिच्या गाण्याशिवाय पार पडायचे थांबले. ज्या समाजानं संसारांतून प्रतिष्ठितपणें तिची हकालपट्टी केली होती त्यापैकींच कित्येक प्रतिष्ठित तिच्या हातच्या पट्टीकरतां तिष्ठत बसूं लागले.

“ सूडाकरतां सूड होता तो.

“ अनेक लक्षाधीश भिक्षाधीश झाले. अनेक कुटुंबें या सूडाच्या यज्ञांत भस्म झालीं, अनेक सभ्य लोकांची अब्रू बाहेर आली......”

“ पुरे कर तुझं हें सूड–पुराण...” रागामुळें अनंगच्यानें पुढचे शद्ब उच्चारले जाईनात.

“ इतक्यांतच पुरे करूं ! छेः ! हें सूड–पुराण असंच पुढें चालणार. आई

म्हातारी झाली. समाजाला वाटलं सुटका झाली त्याची. पण नागिणीनं कातनी टाकली कीं ती परत तरुण नाहीं का होत ? माझ्या रुपानं आईच उभी आहे.

" समाजाचा सूड--पुरा सूड उगवण्या करतां मी उद्यांपासून वेश्या--व्यवसाय सुरू करणार आहें. आईची अपुरी राहिलेली प्रतिज्ञा पुरी करण्याची तयारी मी गेलीं पांच वर्षे कडेकोट करीत आहे. गाण्यांत अन् दिल्रुब्यांत आईपेक्षां माझी तयारी कांकणभर जास्तच आहे. अन् रूपसंपदेच्या दृष्टीनेंही फारशी कमतरता नाहीं."

" मग कॉलेजचं शिक्षण हेही त्या तयारीचाच एक भाग असेल......!"

" अर्थातच तुझ्यासारख्या कांहीं कुळांना आकर्षून कसं घ्यावं हें शिकण्या-करतां कॉलेजमध्यें जसं चांगलं क्षेत्र असतं तसं इतर का कोठें मिळणार आहे?"

" माझ्याकडून लग्नाचं वचन घेतलंस तेंदेखील पूर्वतयारी म्हणूनच कां ?"

" अनंग आज तुला सगळंच सांगणार आहें. तुझ्याकडून लग्नाचं वचन तुझ्यावरील प्रेमामुळं मी घेतलं अशी जर तुझी समज असेल तर ती तुझी चूक आहे. गेले आठ दिवस वगळले तर मी तुझ्याकडे माझ्या सूडाच्या प्रतिज्ञेपूर्वीचं एक साधन म्हणूनच पहात आलें. लक्षाधिशाचा एकुलता एक मुलगा तूं. माझ्या नादीं लागून आईबापाला सोडलंस अन् तुझ्या घराण्याचा जवळजवळ नाश व्हायची वेळ आली. तुला वाटत होतं तुझ्या त्यागानं मला आनंद झाला. छेः ! तुझ्या त्यागानं झालेला आनंद नव्हता तो. इतका सुंदर बळी सुरवातीलाच मिळणार याचा आनंद होता तो.

" तुला काय वाटतं मी तुझ्याशीं खरंच लग्न करणार होतें म्हणून. गेलीं बारा वर्षें सूडाच्या प्रतिज्ञेची मी देखील उजळणी रोज करीत आलें आहें ती कांहीं लग्नाकरतां नव्ह. कदाचित् केलंच असतं लग्न तर तें एकाच गोष्टीकरतां. लग्नानंतर वेश्याव्यवसाय सुरू करून तुझं समाजांतील उरलं सुरलं स्थान घालविण्याकरतां..."

पांढरा फटफटीत पडलेला अनंग उठण्याचा प्रयत्न करूं लागला. निष्फळ झाला तो. उभा रहातो न रहातो तोंच खुर्चीत परत कोसळला तो.

" अनंग ! अनंग !!......"

मालन घाबरून उठली अन् त्याच्या खांद्यावर हात ठेवला तिनं ! तसल्या मनःस्थितींतही त्याला तिचा स्पर्श सहन झाला नाहीं. त्यानं तिचा हात झिडकारला.

" फसवणाऱ्या मालनपेक्षां सत्यकथन करणाऱ्या मालनचा स्पर्श तुला वाईट वाटतो ना ? आतांपर्यंत वर्णन केलेली मालन आठ दिवसांपूर्वीची होती. गेल्या आठ दिवसांत बराच फरक झाला. माझ्यांतलं स्त्रीत्व जागं झालं, अन् तुझ्याविषयीं मला खरंखुरं प्रेम वाटूं लागलं. प्रेमाच्या कळीचं फूल होण्यापूर्वीच तिला खुडून टाकणं भाग पडलं मला ! आणि म्हणूनच सर्व खरी हकीकत सांगितली तुला. माझ्यांतील ज्या स्त्रीत्वानं बळी पडत असलेल्या तुला वाचवलं तेंच कदाचित् पुढंही माझ्या प्रतिज्ञापूर्तीच्या आड येईल म्हणून उद्यांपासून मला वेश्याव्यवसाय सुरू करून त्याची वाढ कायमची बंद केली पाहिजे...

" जातोस अनंग, जा. मालनला विसरण्याचं वचन देण्याची गरज नाहीं. कारण तिला विसरणं तुला शक्य नाहीं.

" कधीं आठवण झाली तर ये माझ्याकडे. वेश्या पतिता असली तरी वेश्यागमन करणारे समाजाच्या दृष्टीनें थोडेच पतित असतात...

" लक्षाधिशाचा मुलगा तूं. त्या संपत्तीच्या शोभेकरतां एकादी वेश्या पाहिजेच रे तुला......

-१३-

# कालप्रवाह

अतीशय मोहक दृश्य होतं तें. पहाणारा किती वेळ पहात राहिला तरी तृप्ति म्हणून लाभणं शक्य नव्हतं.

चंद्राच्या एका स्पर्शासाठीं झाडांचे शेंडे उंचउंच जात होते. दूरवर एक डोंगर अंधुकअंधुक दिसत होता. भरतीचं साठलेलं उथळ पाणी. त्यावर लाटा त्या काय फुटणार ! पण त्या पाण्यावर उठणारे तरंग म्हणजे जणूं गवयाच्या बोल–तानाच. आकाशांत कुठं एखादा मेघ भटकत होता. मागें वाऱ्याचा ससेमिरा होताच ना !

खारा वारा अंगाला अगदीं बिलगून राहिला होता. अंगावरचे कपड्यांत शक्य तेवढं अंग झांकून घ्यावं अशी साहजिकच माणसाच्या मनांत इच्छा उत्पन्न होत होती.

रस्त्यावरचे दिवे आपापल्यापरी सुखांत होते. इतक्यांत तेथून एक मोटर 'भर्रकन्' निघून गेली. दोनच माणसं होतीं त्यांत. काळ्या कुळकुळीत कपड्यांनीं सजलीं होतीं तीं. गाडीचा रंगसुद्धां काळाच होता अन् म्हणूनच त्या मोटरचीं पांढरीं शुभ्र चाकें खुलून दिसत होतीं.

भरवेगांत गाडी हांकीत होती उषा. अविनाश जवळच बसला होता. मधून-मधून हास्याचे फवारे उठत. पण मागें अदृश्य होणाऱ्या रस्त्यासारखेच होते ते. समोरून तितक्याच वेगानं गाडी आली. अविनाशनें कौतुकानें उषेकडे पाहिलं. मोठ्या चपलाईनें तिनें गाडी वळविली. त्याचवेळीं अविनाशचा तोल गेला. असा झुकता तोल सांवरायचा प्रयत्न मनुष्य तरुण असतांना कधींच करीत नाहीं. डोळे अगदीं वर करून अविनाशनं उषेच्या खांद्याकडे पाहिलं.

उषेनं गाडी थांबविली. एका बाजूनें ती अन् दुसऱ्या बाजूनें अविनाश बाहेर आलीं. खाट्कन् दोन्हीं दरवाजे लागले. आनंद, बेजबाबदारपणा ह्यांचं मिश्रण होतं तें.

आतां तीं किनाऱ्यावर आलीं होतीं. समोरचा प्रशांत सागर–किनारा, पांढरे ढग व चंद्र एवढंच सौंदर्य तिथें होतं. कवीच्या डोळ्यांना फार तर दोन बाजूच्या डोंगराच्या रांगा आणखी दिसल्या असत्या.

'झपूझपू' पावलं पडत नव्हतीं. तीं त्या वाळूंत रुतत होतीं म्हणून तर एकमेकांच्या हातांचा आधार घेतला होता एकमेकांनीं.

समोरून धांवत गेलीं दोनतीन माणसं त्यांच्या. अविनाशलासुद्धां पळायची लहर आली. पण तो तसं सांगायच्या पूर्वीच उषा पळूं लागली होती. प्रेम म्हणजे दोन मनांची मिळणी ना ! तशीं काय तीं सुदृढ होतीं अशांतला भाग नव्हे. दोनचार मिनिटांत 'हा हूं' करीत एका खडकाशीं कमरेवर हात ठेवून दोघं उभीं राहिलीं. जवळून एक 'शहाळींवाला' जात होता. त्याच्याकडून दोन शहाळीं फोडून घेतलीं. पुन्हा वर येऊन बसलीं दोघं.

" ए मला तें शहाळं पाहिजे " उषेच्या हातातलं शहाळं हिसकावून घेत अविनाश म्हणाला.

" वा ! एव्हांपासून नवरेपणाचा हक्क गाजवितो आहेस "

" गोड आहे बुवा " खोबरं खात अविनाशानें उषेला कोपरखळी मारीत म्हटलं.

" हं " तिनंसुद्धां त्याचीच प्रतिकृति केली.

" किती सुंदर आहे नाहीं "

" काय ? "

" हें आपलं निळं आकाश " कांहींतरी बोलायचं हें प्रेमिकांचं ध्येय असतं.

ती त्यांची उन्मादक अवस्था होती. त्यांत प्रणय हें साधन होतं. धुन्द पार्श्वभूमीवर त्या कॉलेजांतल्या तरुणांना काय वाटतं हें परमेश्वरालाच माहिती. त्या दोघांचं प्रेम होतं एकमेकांवर अगदीं उत्कट.

निसर्गानं अप्सरेचं रूप घेतलं होतं. त्यांच्या त्या प्रसंगाला पोषकच होतं तें. व्रताची सांगता पारण्यानें फेडतात तसा ह्या प्रणयप्रसंगाचा शेवट गोड गाण्यांत झाला. उषा म्हणूं लागली. 'हूं हूं हूं' म्हणून अविनाश त्याला ताल देऊं लागला. प्रेमगीतें कधींच बदसूर नाहीं होत. कायमचीं हिरवीं पानंच. त्यांच्या

गाण्यांत दुसरं काय असणार? 'प्रेम प्रेम हें जग बोले' ह्या वाक्याच्या आधा-रासाठींच तरुवेली चंद्रतारका त्या ठिकाणीं गुण्यागोविंदानें रहायला आल्या होत्या.

व्रताची सांगता पारण्यानें होते खरी. पण मुखशुद्धीसाठीं विडाहि द्यावा लागतो. त्याची आठवण अविनाशाला बरोबर होती. अविनाशाचं घड्याळ कंटाळून गलं. दहा अकरा...बारा...अगदीं एकेरीला आलं होतं तें!

उषा उठली अविनाशानें तिला खालीं बसवलं. "विडा द्या हो" पुरं न म्हणतांच तिच्या लक्षांत आलं. तिनं खालीं पाहिलं.

लाटा गगनाला गवसणी घालूं लागल्या. चंद्रानं ढगाबाहेर तोंड काढल्यानें उषा अविनाशांच्या छाया वाळूवर स्पष्ट दिसूं लागल्या. वारा अतीशय झोंबूं लागला.

क्षणभर दोन्ही छाया एकत्र झाल्याचा भास झाला. ओंठावरून रुमाल फिर-वीत उषा उठली. तसाच तोहि उठला व अंग झाडूं लागला.

उन्माद ओसरला नव्हता.

बऱ्याच वेळेला छाया एकत्र येत पुन्हा विलग होत शेवटीं—

"चला ना आतां घरीं"

"आतां फक्त एकच"

"हूं" दूरदूर पळणाऱ्या छाया एकत्र आल्या.

'भुर्र' करीत मोटार आल्यापावलीं निघून गेली.

× × × ×

—२—

तो उन्माद ओसरून गेला होता. उषा न् अविनाश ह्यांचा विवाह झाला होता. तीं आतां प्रियकर, प्रेयसीपेक्षां पतिपत्नीच्या नात्यानें वावरत होतीं.

पूर्वींसारखीं ती स्वतः आतां मोटार उडवीत जात नसत फिरायला. त्यांच्या जीवनांत अतीशय फरक झाला होता.

अविनाश प्रोफेसर झाला होता म्हणूनच उषेला प्रोफेसरीण म्हणत. संपत्ती

लक्ष्मीचीच पावलं हुंगीत जाते म्हणतात. घरची श्रीमंती त्यांत ही नोकरी. सुंदर बंगला होता आतां त्यांचा.

त्यांनीं आतां एक ‘ शोफर ’ ठेवला होता. बेभान व्हायचं, वारा पिऊन टाकीत गाडी हांकायची, हें त्यांच्या जीवनांतलं कार्य राहिलं नव्हतं.

त्याला दुसऱ्या दिवशींचीं टांचणं करायचीं असत. पौर्णिमेच्या रात्रींसह अमावास्येच्या रात्रीं सुखानें काल घालवूं लागल्या होत्या. पूर्वींचे उन्मादावस्थेतले प्रसंग त्यांच्या जीवनांत रम्यता आणीत खरे पण त्यापेक्षां इंग्रजी मराठी काव्यांतले प्रेमप्रसंग शिकवितांना तो जास्त रंगून जायचा. त्या शिकविण्यांत त्याला स्वतःच्या स्मृतीच व्हायच्या वारंवार. आपल्या समोर बसलेल्या तरुण-तरुणींना तें सुख मिळेल का या प्रश्नाचीं उलटसुलट उत्तरं गर्दी करूं लागलीं कीं सोडून देई तो प्रश्न. कारण ‘ काळ ’ त्या प्रश्नाचं उत्तर चांगलं देतो.

उषा आतां ‘ त्याची जोडीदारीण झाली होती. आयुष्यांत अविनाशाव्यतिरिक्त कांहीं आहे, प्रेमाशिवाय कांहीं कर्तव्यें करायचीं असतात याची जाणीव तिच्यांत निर्माण झाली होती. अवि कॉलेजांत गेला तर कांहीं वाच, मैत्रिणींना भेट, लहान पोरींशी खेळ, असं सुखी जीवन घालवीत होती ती.

तिलाहि ती स्वप्नं-स्वप्नं कसलीं सत्यंच तीं-आठवून हंसूं यायचं-आनंद वाटायचा. क्षणभर गोड झिणझिण्या उठायच्या शरीरभर. पण तें एकच व्यवधान नव्हतं तिचं. तिला अलीकडे टापटिपीचा नाद लागला होता. पूर्वी अवीच्या पाकिटांत स्वतःचा फोटो असावा असं वाटत असे पण आतां तसं कांहीं वाटत नसे. तशी तिची अपेक्षाच नव्हती.

पण एवढं होतं तरी प्रतिदिनीं ५ वाजतां फिरायला जात दोघं. शोफरच हांकी गाडी. अरुणच्या प्रेमांत वा पौर्णिमेच्या बेभान मनस्थितींत नसत आतां तीं. संथ पण संयमी होती त्यांची चाल. वेळींअवेळीं आपला हात अविनें धरावा अशी तिची अपेक्षा नव्हती. बरं धरलाच तरी त्याचं कांहीं विशेष वाटेनासं झालं होतं तिला.

एक दिवस तीं जुहूवर गेलीं होतीं फिरायला. पहांटेची रम्य वेळ होती ती. शोफरला गाडी चालवायला बसवून दोघंजणं मागें बसलीं. किती फरक होता

त्या बसण्यांत! मंदावत जाणारा शुक्रतारा, निस्तेज होणारं आकाश यावरच्या काव्यमय कोट्यांत आतां त्यांना सुख नव्हतं. गडकऱ्यांचं 'गुलाबी कोडें' त्यांना उकलायचं नव्हतं. 'अरुण' आतां प्रेमप्रकाश पाडायला समर्थ नव्हता.

तसाच पोषाख किती साधा! त्या झालरी वेलबुट्टीचे नखरे नव्हते तिथं. साधं पांढरं पातळ, जंपर, वर उबदार स्वेटर—त्याचा तर साधा धोतराचा काचा! गळ्याभोंवतीं एक स्कार्फ गुंडाळला होता.

पूर्वींसारखींच पावलं रुतत होतीं. पण आतां हातांत हात धरायची जरूर नव्हती. ओल्या वाळूंत एकमेकांचीं नांवें कोरायची हौस नव्हती आतां.

'जीवन कशासारखं आहे' असं एकानं विचारलंय् मला. त्याला आज उत्तर द्यायचं आहे मला.

"आयुष्य म्हणजे दिवस. अरुण हें बालपण—तारुण्याचं प्रतिक, नंतर संयमाची सायंकाळ, नि मग मृत्यूची रात्र, मला तर असं वाटतं." तिनं पटकन् उत्तर दिलं.

"हो बरी आहे कल्पना. पण मला वाटतं जीवन हें आकाशासारखं आहे. तें प्रेमाचीं इंद्रधनुष्यें पण निर्मितें तसंच दुःखाचे काळेकभिन्न मेघहि निर्मितें—"

"हो. शिवाय दुःखानंतरच्या सुखासारखंच मेघांतून झिरपणारं जलहि आहेच."

"बरी आहे नाहीं कल्पना?

"हो! पण माझी?"

"तीसुद्धां सांगणार आहें मी वर्गांत"

"त्या मुलाला कळेल कां तें?"

"तें कळविण्यासाठींच तर आम्ही आहोंत ना?"

"हो"

सकाळ झाली. पण त्यांचं प्रेम आतां उन्मादक नव्हतं, संयमी होतं. शरीर-सुखाच्या पलीकडचं त्याला आतां दिसूं लागलं होतं.

तीं वाळूंतून उठलीं अन् कपडे झाडले त्यांनीं. "चला जाऊंया ना"

"हो चल ना" अविनाशनें उत्तर दिलं.

वाळूंत रोवलेली काठी काढून अविनाशाच्या हातीं दिली उषेनं. तिला पूर्वीच्या प्रसंगाची आठवण झाली पण क्षणभरच.

दार उघडलं नि दोघं आंत बसलीं.

' भुर्र ' करीत मोटार आल्यापावलीं निघून गेली.

—३—

क्रूर काळानं त्या दोघांच्या चेहऱ्यांवर आडव्या उभ्या दोऱ्यांचं विणकाम केलं होतं. तिचे ते खेळकर डोळे आतां दोन्ही बाजूंनीं गुंडाळल्या जाणाऱ्या पडद्यासारखे होऊं लागले होते. भव्य कपाळ आतां सुरकुतलं होतं. गाल बसून गेले होते. मांसल बाहूंच्या काठ्या झाल्या होत्या. ' पावडर ' ' स्नो ' चा गंध नव्हता.

**उषा आई झाली होती ३ मुलांची!**
**अविनाश बाप झाला होता ३ मुलांचा!**

वीस वर्षांच्या नोकरीनन्तर अविनाशांना कॉलेजनें निरोप दिला तेव्हांचा प्रसंग त्यांना अजून ताजा वाटत होता. स्वतःच्या जीवनाचं साफल्य नेहमींच डोळ्यासमोर उभं राही. त्यांच्या डोळ्यांच्या पापण्याहि ओलसर होत कधीं कधीं. आपलं कर्तव्य आपण बजावलं खरं पण आपला समाज इतक्या लवकर नि इतक्या प्रेमानं त्याची परतफेड करील असं नव्हतं वाटलं त्यांना.

त्यांना विकास नि सुंदर नांवाचे दोन मुलगे होते. तसंच नेत्रा नांवाची गोड पोरगी होती एक. संयमी मनाचा विजयच नव्हता का तो !

कांहीं कमी नव्हतं त्यांना आतां. दोघांच्या नांवानं कांहीं संस्थाहि झळकत होत्या. उषेचं ' बालमन्दिर ' अविनाशांची ' व्यायामशाळा ' भरभराटीस आलेली होती. आतां समोरासमोर कोंचावर बसून उषा नि अविनाश गप्पा मारीत. त्यांच्या हातांत आतां कादंबऱ्या नव्हत्या. जाडजूड ग्रंथहि नव्हते. साधींसाधीं पुस्तकं होतीं.

त्यांचं जीवन म्हणजे अनुभवांचं भांडार झालं होतं. त्यांचीं बोलणीं आतां मृत्यूच्या बोलावण्यापर्यंत येऊन पोंचलीं होतीं.

आतां फिरायला नसत जात तीं. दिवाणखान्यांत बसून वृत्तपत्रं वाचायचीं आंघोळ नि देवधर्म. प्रोफेसराचा देवधर्म ! पण तेंच त्यांचं सुख होतं आतां.

किती प्रेम होतं त्यांचं एकमेकांवर, पण आतां तें संयमीहि नव्हतं सुविद्य-सुसंस्कृत मनावर नव्हतं. चौवीस भालदारांच्या पहाऱ्यांत असलेल्या इवलाल्या पांच प्राण ज्योतींवर होतं. कुठलीही एक ज्योत चाळविली तर बाकीच्या धडपडत. त्यांच्या संसारनाटकाचा शेवटचा अंक होता तो.

तरीसुद्धां आपल्या मुलांविषयीं बोलतांना किती आशावादी बनत तीं.

आज लहानग्या नेत्राच्या हट्टामुळंच त्यांनीं किनाऱ्यावर पाय ठेवला. नेत्रा तिथं पाऊल ठेवतांच लाटांबरोबर खेळायला गेली. सुधीरला तिच्यामागें लावून तीं दोघें बोलत बसलीं. नेत्राच्या मागून धांवायची चपलता होती कुठं यांच्या अंगीं !

" विकास काल काय सांगत होता ? "

" कांहीं नाहीं ! "

" तरीपण—"

" त्याचं वर्गांतल्या एका मुलीवर प्रेम बसलं आहे. "

" मग एवढं हळू कशाला सांगायला पाहिजे ? "

" पहिलं प्रेम लाजरं असतं. "

" बरं मग ? "

" तसं कांहीं नाहीं पण— "

" काय ? "

" मुलगी आपल्या जातींतली नाहीं एवढं नाहीं आवडलं मात्र मला "

" प्रेमाला फक्त निसर्गजातीच ठाऊक असतात असं मी वाचलं आहे कुठें तरी "

" पण व्यवहार ? "

" त्यानंहि प्रोफेसर व्हावं नन्तर मी मरावं अशी माझी इच्छा होती. शिक्षणांत व्यत्यय नको यायला."

" तसं कसं म्हणून चालेल. सुधीर नेत्रांची काय वाट ? "

" हो. ज्योत कधीं मालवावी हें वायुला माहीत असतं पण तोंपर्यंत जगण्याचा करूं प्रयत्न " सुधीरनें पकडून आणलेल्या नेत्राला धरीत ' दादा ' म्हणाले.

पुन्हां जरा वेळानें ती दोघं गेलीं खेळायला. यांच्या भावना अनावर झाल्या. आपला तारुण्यपट दोघांच्याहि डोळ्यांपुढून सरकूं लागला. संपला. उषेनं लाजून खालीं मान घातली. किती मधुर आठवणी होत्या त्या. नदी पोहून गेल्यावर अलीकडे पहाण्याचा आनंद होता त्यांत.

विकास आपल्या प्रेयसीला घेऊन धांवत जातो आहे असं वाटूं लागलं त्यांना. ह्यावेळीं उन्माद नव्हता. संयम नव्हता. संध्याकाळच्या छायाछत्राखालीं वावरत होतीं तीं.

सुधीर पुढें बसला. नेत्रा 'दादांच्या' मांडीवर बसली. उषा डाव्या बाजूला बसली.

' भुर्र ' करीत आल्यापावलीं मोटर निघून गेली.

-१४-

# देव-दगड कीं खडक ?

नदीच्या रुंदशा पात्रांत डोंगरावरून आलेला एक भला मोठा खडक होता.
त्याच्या समोरच नदीतीरावर शेंदूर फासून देव मानलेला दगड होता.
भक्तिभावानें दररोज एक मुलगा नमस्कार करी त्या दगडाला !
बरोबर होतें तें ! कारण ?—
तो देव होता.
आणि समोर तो खडक तटस्थ राहून तें सर्व पाहात असे.
त्याला लोक नमस्कार करीत ?—

* * * *

धो...धो...धो !!!—
पावसानें तर सकाळीं कमाल केली !—
नदीला पूर आला ती तुडुंब भरली ! !—
त्याच वेळेस लाटा जोराजोरानें त्या खडकावर आपटत होत्या......
पण तो ?—
तटस्थ राहून त्यांना न जुमानतां अफाट नदीकडे पाहत होता !
तो समोरचा देव-दगड मात्र लाटांच्या बरोबर आदळत आदळत जात होता !

* * * *

नागिणीसारखी एक लाट त्या खडकावर आदळली.
तिच्याबरोबर तो मुलगा वहात आला होता.
त्यानें कसाबसा त्या खडकाचा आश्रय घेतला.

* * *

पाऊस आतां अजिबात थांबला होता !

नदीचें पाणी हळूहळू ओसरत होतें !

तो मुलगा नदीचें पाणी ओसरूं लागल्यावर पोहत पोहत नदीतीरावर आला होता.

त्यानें साश्रुनयनांनीं त्या खडकाला कृतज्ञतापूर्वक प्रणिपात केला.

आतां—

त्याचा देव—दगड कीं खडक ?